असल्या चळवळींमध्यें असतो. त्यासाठीं सभासदांची संख्या फार मोठी असावी लागते, आणि अमुक अमुक मत असेल तरच माणसाला सभासद होतां येईल असा सभासदांवर निर्बंध असतो. पण

## थिऑसफीची चळवळ सांस्कृतिक आहे.

उद्यां अमुक मिळवावयाचें असें तिचें विशिष्ट ध्येय नाहीं. राजकारणांत किंवा अर्थकारणांत एकादा पक्ष निर्माण करण्याचें तिचें उद्दिष्ट नाहीं. त्यामुळें मुद्दाम खटपट करून आपले सभासद वाढविण्याचें तिचें धोरण नाहीं. अमक्या मताचाच माणूस तिचा सभासद होऊं शकेल असें सभासदांवर बंधनही नाहीं. अर्थात् परस्परविरोधी मतांचीं माणसेंही थिऑसाफिकल सोसायटीचे सभासद होऊं शकतात.

एकाद्या उत्साही व जिज्ञासू माणसाला उंच टेकडीवर नेलें तर त्याला सभोंवारच्या खालचा भूमिभाग दिसेल. त्याला शेतें दिसतील, नद्या दिसतील, खोरीं दिसतील, उपवनें, बागबगीचे, खाणी दिसतील. जमिनीवरून या गोष्टी पाहिल्यास जशा दिसतील तशाच टेकडीवरून दिसणार नाहींत. टेकडी-वरून दिसणारा देखावा अधिक व्यापक, अधिक विस्तृत, अधिक मूलग्राही व अधिक सुंदर असेल, आणि तो पाहून त्याला अधिक शहाणपणा येईल आणि स्फूर्ति मिळेल. थिऑसफी म्हणजे एक उंच गिरिशिखर आहे असें म्हटल्यास चालेल. त्या शिखरावर आरूढ होऊन सभोंवतालची मानवी उद्योगांचीं नाना क्षेत्रें पाहिलीं तर माणसाला नवीन दृष्टि येते, व जमिनी-वर चालत असतांना ज्या गोष्टी त्याला समजलेल्या नव्हत्या त्या त्याला समजतात.

## एक नवीन दृष्टि

जगाला अशी एक दृष्टि द्यावी, त्या दृष्टीमुळें माणसाच्या हृदयांत नवस्फूर्ति निर्माण व्हावी, त्याला अधिक शहाणपण यावें, असा थिऑ-सफीचा हेतु आहे. एकदां माणसाला शहाणा करून सत्प्रवृत्त केलें म्हणजे मग त्यानें कोणते उद्योग करावे, स्वतःच्या आणि जगाच्या

सुधारणेसाठीं कोणत्या क्षेत्रांत कसल्या प्रकारची खटपट करावी यासंबद्दल थिऑसफीनें कोणतेच नियम केलेले नाहींत, आणि कोणतेंच बंधन घातलेलें नाहीं. त्याला हवें तें करण्याची मुभा ठेविलेली आहे. यावरून दिसून येईल कीं, थिऑसफी म्हणजे जगांतील नाना प्रश्नांकडे पहाण्याची एक नवीन दृष्टि आहे.

## आजचा बदललेला काळ

आज जगांत इतका बदल झालेला आहे कीं जुन्या विचारांनीं आपलें भागावयाचें नाहीं. जगाला सांप्रत नवीन दृष्टि शिकविली पाहिजे. जगांत सध्यां नवीन आकांक्षा निर्माण झाल्या आहेत. दारिद्र्याची हकालपट्टी करावी, कोणीही माणूस कंगाल असूं नये अशी आकांक्षा समाजसत्तावादानें सर्व जगभर फैलावली आहे. जगांत लढाया नसाव्या, सर्व देशांनीं गुण्या–गोविंदानें रहावें अशी नवीन आकांक्षा जगांत डोकावत आहे. निरनिराळ्या धर्मांमध्यें भांडणें होतात तींहि बंद व्हावीं असें पुष्कळ विचारी पुरुषांस वाटूं लागलें आहे. सर्व देशांना स्वतंत्रता असावी कोणत्याही देशाला दुसऱ्या देशाला दास्यांत ठेवण्याचा हक्क नाहीं, ही भावना सर्व जगांत प्रबल होत आहे. बुद्धिमान लोकांची आज धर्मावर श्रद्धा नाहीं. धर्म ही अफूची गोळी आहे, धर्मांत सारा भोळसटपणा आहे, तो जुन्या अन्यायी परंपरेला उचलून धरतो आणि जग सुधारण्याच्या आड येतो, अशी त्यांची धर्माविरुद्ध तक्रार आहे. जुन्या दृष्टीला हें बदलत असलेलें जग, त्याच्या आकांक्षा व त्यांतील अडचणी आकलन होत नाहींत. त्या दृष्टीला या अडचणींतून मार्ग कसा काढावयाचा तें समजण्याची कुवत नाहीं.

व्यक्तिदृष्ट्याही जगांत मोठाले बदल होत आहेत. जगांत नवीन यंत्रें, सुखाचीं नवीन साधनें, नवीन करमणुकी निघाल्या आहेत. पण त्यांनीं सुख व समाधान मिळत नाहीं असा अनुभव आहे. मधून मधून अशीं माणसें आढळतात कीं, तीं श्रीमंत आहेत, त्यांचे घरीं मोटार आहे,

रेडियो आहे, नोकर आहेत, पण घरांत सुख समाधान नाहीं. लोकप्रियता, पैसे, अधिकार हीं मिळविण्याची लोकांची सर्वत्र धडपड सुरू आहे, पण हीं धडपडणारीं माणसें सुखी दिसत नाहींत. जुनें मोडत चाललेलें दिसत आहे. पण सुख देईल असें नवें मात्र त्या जागीं आलेलें दिसत नाहीं.

जगांतील व्यक्तीला एक नवीन दृष्टि द्यावी, एक नवीन प्रकारचा समजूतदारपणा लोकांत निर्माण करावा यासाठीं थिऑसफीची चळवळ जगांत आली आहे.

आज सायन्सचें युग आहे. सायन्सनें जनमनासमोर पुष्कळ नवीन कल्पना ठेवल्यामुळें बुद्धिमान माणसाच्या मनाची पार्श्वभूमि बदललेली आहे. उत्क्रान्तिवादाची मूलभूत कल्पना आज सर्व विचारी माणसांच्या मनांत इतकी मुरलेली आहे, कीं कोणत्याही गोष्टीचा विचार करावयाचा असला तर तो उत्क्रांतिवादाच्या चौकटींत बसवावा लागतो. सृष्टीचें अवलोकन करणें, प्रयोग करणें, या गोष्टी सायन्सनें जगाला शिकविल्या आहेत व ज्या ज्ञानाला प्रयोगांचा आधार नाहीं त्याला लोक कविकल्पना म्हणून टाकून देतात. ज्या गोष्टी प्रयोगासिद्ध आहेत तेवढ्याच खऱ्या असें मानण्याची प्रवृत्ति जगांत बळावलेली आहे. कोणत्याही पदार्थाचें वर्णन करावयाचें असेल तर तें तपशीलवार पाहिजे, तंतोतंत बरोबर असलें पाहिजे, अशी अपेक्षा सायन्सनें जिज्ञासू माणसाच्या मनांत निर्माण केली आहे. कंप ( Vibration ), जीवद्रव्य ( Protoplasm ), पेशी ( Cell ), क्रिया-प्रतिक्रिया (Action-reaction), वगैरे अनेक शास्त्रीय कल्पना सायन्सनें लोकांच्या विचारांत ओतल्या आहेत आणि तसल्या परिभाषेनें एकादी गोष्ट सांगितली नाहीं तर ती लोकांस पटेनाशी होते अशी स्थिति आज आली आहे.

बदलत असणाऱ्या या जगाला मार्ग दिसावा यासाठीं एक नवीन दृष्टि देणारी जी चळवळ जगांत आली आहे, तिला थिऑसफी असें नांव

आहे. व्यक्तींत आणि समाजांत एक नवीन प्रकारचा समजूतदारपणा तिला निर्माण करावयाचा आहे.

## थिऑसफी ही मूलग्राही चळवळ आहे

त्या चळवळीनें माणसाला शहाणपण दिल्यावर मग त्यानें आपल्या परिस्थितींत कसें वागावें, आपल्या अडचणी कशा सोडवाव्या, सार्वजानिक प्रश्नांची कोणतीं उत्तरें स्वीकारावीं, या गोष्टी प्रत्येक माणसानें स्वतः ठरवावयाच्या असतात. जगांत निरनिराळे प्रश्न आहेत. ठिकठिकाणची परिस्थिति वेगळी आहे. थिऑसफी माणसाला मूलग्राही ज्ञान देते. त्या ज्ञानाचा उपयोग करून माणसानें आपापल्या परिस्थितींत योग्य ती उपाययोजना करावयाची असते. एके ठिकाणीं एक उपाययोजना उपयुक्त ठरेल, दुसऱ्या ठिकाणीं दुसरी उपयुक्त ठरेल. थिऑसफीचें शास्त्र सर्वांना एकच उपाययोजना दाखवून देत नाहीं. तें मूलभूत गोष्टी शिकवितें. त्या शिकल्यावर ज्यानें त्यानें आपला विचार करून आपल्या व जगाच्या जीवनांतले प्रश्न सोडवण्याकरितां काय करावयाचें तो तपशील ठरविणें अवश्य असतें. समजा, एक तरुण मुलांचा शाळेंतील वर्ग आहे. त्या तरुणांची मनीषा आपली प्रकृति सुधारावी, निरोगी व्हावी, सशक्त व काटक व्हावी अशी आहे. या वर्गांतला शिक्षक त्यांना आरोग्यशास्त्राचे, व्यायामशास्त्राचे, शरीरशास्त्राचे, वैद्यशास्त्राचे मूलभूत नियम शिकवील. ते शिकल्यावर त्या वर्गांतील प्रत्येक तरुणानें आपलें वय, आपली आवड, आपल्या प्रकृतींतील गुणदोष, आपली परिस्थिति यांचा विचार करून मग आपण आपल्या वागण्यांत कोणती शिस्त ठेवावी, आहारांत कोणता बदल करावा, कोणता व्यायाम किंवा खेळ खेळण्याचा उपक्रम करावा हें त्यास ठरवावें लागेल. तसें थिऑसफींत आहे. थिऑसफी हें मूलभूत ज्ञान आहे. तें समजल्यावर आपापल्या परिस्थितींत त्याचा उपयोग करतांना माणसानें तारतम्य पाहिलें पाहिजे. थिऑसफींत सर्व कूट प्रश्नांवर नवीन प्रकाश पाडण्यांत येतो. पण अमक्या रोगांवर अमुक

गोळया, तमक्या रोगांवर तमुक औषध अशी पेटंट घेतलेली ठराविक औषधयोजना थिऑसफींत नाहीं.

कोणत्याही क्षेत्रांतलीं मूलतत्त्वें शाश्वत असतात. माणसाची व जगाची प्रगति कशी होईल; माणूस व जग सुखी कसें होईल या प्रश्नांच्या पाठीशीं असणारीं मूलतत्त्वें पूर्वीं होतीं तींच आज आहेत. तीं आजच्या परिस्थितीस लागू करण्यासाठीं नवीन रीतीनें मांडावयास हवींत. त्या दृष्टीनें पहातां जुना धर्म, जुनी संस्कृति, जुनें तत्त्वज्ञान यांच्या बुडाशीं असलेलीं जुनीं शाश्वत तत्त्वें नवीन शब्दांनीं व नव्या रीतीनें जगासमोर ठेवण्याचा उद्योग म्हणजे थिऑसफी होय असें म्हटलें तर चालेल.

## एक नवीन मांडणी

थिऑसफींतील नवीन मांडणीच्या बुडाशीं संशोधन आहे. समजा, एका माणसाला लंडन शहराच्या वर्णनाचें पुस्तक लिहावयाचें आहे. त्या माणसाला ( लंडनला न जातां ) तेथें राहाणाऱ्या लोकांनीं वेळोवेळीं जीं लंडनचीं वर्णनें पूर्वीं लिहिलेलीं असतील तीं गोळा करून त्यावरून लंडनचें वर्णनात्मक पुस्तक आज हिंदुस्थानांत राहून लिहितां येईल. अथवा लंडनला जाऊन व तें शहर नीटपणें व बारकाईनें प्रत्यक्ष पाहूनही वर्णनात्मक पुस्तक लिहितां येईल. पहिल्या प्रकारच्या पुस्तकांत अगदीं अलिकडची माहिती येऊं शकणार नाहीं. आधारभूत पुस्तकें जेव्हां लिहिण्यांत आलीं त्या वेळची लंडनची स्थिति त्या पुस्तकांत येईल. पण गेल्या महायुद्धांत बॉंब पडल्यामुळें लंडन शहरांत काय बदल झाले वगैरे अगदीं अलिकडच्या गोष्टी त्या जुन्या आधारग्रंथांत नसल्यामुळें त्या त्या पुस्तकांत येऊं शकणार नाहींत व तितक्या पुरतें त्या पुस्तकांत वैगुण्य राहील. शहरांत अलीकडे झालेल्या फेरफारांचा प्रश्न जरी सोडून दिला तरी मूळ आधारग्रंथांत जी माहिती नाहीं तीही या नवीन पुस्तकांत सांपडणार नाहीं. समजा, जुन्या आधारग्रंथांत एकाद्या मनोऱ्याची उंची दिलेली नसली किंवा लंडनमध्यें जमिनीखालून जी रेल्वे केलेली आहे,

रींत हवा खेळविण्यासाठीं काय व्यवस्था केलेली आहे ही माहिती दिलेली नसली तर ती नवीन पुस्तकांत घालतां येणार नाहीं. पण पुस्तकाचा लेखक जर लंडनला अनेकदां जाऊन व शहराचें पुनः पुनः प्रत्यक्ष अवलोकन करून आला व मग पुस्तक लिहावयास जर बसला तर त्याच्या पुस्तकांत अगदीं सविस्तर माहिती येईल. जुन्या आधारभूत ग्रंथांत ज्या गोष्टी नाहींत त्याचें त्याला अगत्य असल्यास त्या गोष्टीही प्रत्यक्ष पाहून त्याचें वर्णन त्याला आपल्या पुस्तकांत घालतां येईल. हें दुसऱ्या प्रकारचें पुस्तक प्रत्यक्ष अवलोकनावर आधारलेलें असल्यामुळें तें वेगळ्या प्रकारचें होईल. कारण त्याच्या बुडाशीं संशोधन असणार. थिऑसफीची मांडणी नवीन प्रकारची होऊं शकली आहे. थिऑसफीला संशोधनाचा आधार असल्यामुळें ज्या गोष्टींचा विचार जुन्या ग्रंथांत नाहीं, जे प्रश्न जुन्या ग्रंथांत विवेचिलेले नाहींत, जो तपशील जुन्या ग्रंथांत सांपडत नाहीं तोही थिऑसफींत येऊं शकतो. यामुळेंच थिऑसफीच्या मांडणींत नाविन्य आहे.

## मृत्युविषयक शास्त्रीय संशोधन

एक उदाहरण घेऊं. मृत्यूनंतर जीव शाबूद रहातो असें जगांतील सर्व धर्मांनीं सांगितलेलें आहे. भगवद्गीतेंत आणि उपनिषदांत तशीं स्पष्ट विधानें आहेत. मरणोत्तर काय होतें याची कांहीं माहिती गरुडपुराण, योगवासिष्ठ वगैरे अनेक ग्रंथांत आहे. हीं पुस्तकें नीट वाचलीं तर मृत्यूच्या वेळीं देह मरतो नंतर जीव त्या देहाला सोडून स्वतंत्रपणें रहातो, तो दुर्वर्तनी असला तर नरकांत पडून दुःख भोगतो, सद्वृत्त असला तर स्वर्गांत जाऊन सुख भोगतो असा निष्कर्ष त्या पुस्तकांतील वर्णनावरून काढतां येईल. पण हीं जुन्या ग्रंथांतील वर्णनें मुख्याच्या गोष्टींबद्दल अगदीं थोडी माहिती देतात. आजच्या जिज्ञासू लोकांना जी माहिती हवी आहे ती या ग्रंथांत फारशी सांपडत नाहीं, उदाहरणार्थ जीव म्हणून देहावेगळी एकादी वस्तु आहे का? असली तर जिवंतपणीं ती कोठें असतें? मृत्यूच्या क्षणीं

देह व जीव यांच्या संबंधांत काय फरक होतो ? देह जाळल्यावर अथवा पुरल्यावर जीव कोठें जातो ? तो कसा दिसतो ? त्याला रंगरूप लांबीरुंदी असते का ? तो कशाचा बनलेला असतो ? स्वर्गांत किंवा नरकांत तो किती वेळ काढतो ? स्वर्गनरक हे कोठें आहेत ? खरोखरीच हे अस्तित्वांत असले तर ते माणसाला दिसत कां नाहींत ? माणूस रोगानें मेला किंवा आगगाडीखालीं सांपडून मेला अथवा आत्महत्या करून मेला तर मरणोत्तर अवस्थेंत फरक होतो का ? नवरा व बायको दोघें मेल्यावर तीं एकमेकांस भेटतात का ? त्यांचे पतिपत्नीसंबंध कायम रहातात का ? मृत माणसाला पूर्वीच्या आयुष्याची आठवण असते का ? मृत माणसांना जिवंत माणसें दिसतात का ? जिवंत माणसांचें वसतिस्थान व मृत माणसाचें वसतिस्थान यामध्यें किती अंतर असतें असे नाना प्रश्न या बाबतींत उद्भवतात. उपनिषदें, गीता वगैरे हिंदूधर्मग्रंथांत या प्रश्नांची सविस्तर व तपशीलवार उत्तरें नाहींत. इतर धर्मांतल्या ग्रंथांतही नाहींत. हे सारे ग्रंथ जुन्या काळीं लिहिलेले आहेत. त्या वेळेस असे प्रश्न लोकांच्या मनांत येत नसत. आज सायन्सचा प्रसार झाल्यामुळें असले प्रश्न जिज्ञासू माणसाच्या मनांत सहज येतात. त्यांचीं उत्तरें देणें अवश्य आहे. मृत्यु म्हणजे खरोखरी काय हा महत्त्वाचा प्रश्न आहे. त्याचें विवेचन नवीन रीतीने केल्याखेरीज तें आज कोणासही पटणार नाहीं. नुसते जुने आधारग्रंथ गोळा करून त्यांच्या संकलनानें नवीन प्रकारचें विवेचन करतां येणार नाहीं. लंडन शहरांत अनेकवार हिंडूनच जसें संशोधनात्मक वर्णन लिहितां येतें, तद्वत् मरणोत्तरच्या परिस्थितीचें प्रत्यक्ष निरीक्षण करूनच त्या अवस्थेचें संशोधनात्मक वर्णन देतां येईल. अशा वर्णनांतच नवीन माहिती येऊं शकेल आणि नवीन शंकांचें समाधान होईल. मृत्यु म्हणजे काय या विषयासंबंधाचें असें नवीन प्रकारचें वर्णन थिऑसफींत आहे, आणि तें काल्पनिक नसून संशोधनात्मक आहे. थिऑसफीची विषयमांडणी नवीन आहे असें जें आम्ही म्हणत आहों त्याचा अभिप्राय या एका उदाहरणावरून वाचकांच्या ध्यानांत येण्याजोगा आहे.

जगांत आज जे धर्मग्रंथ प्रसिद्ध होत आहेत ते संशोधनावर आधारलेले नाहींत. जुने आधारग्रंथ गोळा करावयाचे व त्यावरून नवीन पुस्तकें लिहावयाचीं असा उद्योग आजचे लेखक करीत असतात. त्यामुळें आजच्या सुशिक्षित व जिज्ञासू लोकांना ते पटत नाहींत, हे ग्रंथ कविकल्पनांवर आधारलेले आहेत, त्यांतील माहिती व विधानें खरीं नाहींत असें त्यांना वाटतें. म्हणूनच थिऑसफीनें नवीन मांडणीची प्रथा जगांत सुरू केली आहे. ती मांडणी संशोधनात्मक आहे, सप्रयोग आहे, आणि अवलोकन, निरीक्षण यांचा तिला भरभक्कम आधार आहे.

## अदृश्य सृष्टीचें संशोधन कसें करतां येतें ?

आपल्या सभोंवार जी सृष्टि आहे तींतील कांहीं भाग आपणाला दिसतो व कांहीं आपल्या इंद्रियांना समजत नाहीं. आपल्या सभोंवार हवा आहे पण ती आपणांला दिसत नाहीं. हवेंत नायट्रोजन, ऑक्सिजन वगैरे निरनिराळे वायु आहेत. पण आपल्या कोणत्याहि इंद्रियानें हा वायु ऑक्सिजन आहे, हा नायट्रोजन आहे असें आपण ओळखूं शकत नाहीं. रेडिओ स्टेशनमधून ज्या विजेच्या लाटा सर्वत्र पसरतात त्या आपल्या अंगांतून आरपार गेल्या तरी आपणाला त्यांची कल्पनाही येत नाहीं. या उदाहरणांवरून दिसून येईल कीं आपणांला न दिसणारा असा सृष्टीचा एक मोठा विभाग आपल्या भोंवतीं विस्तरलेला आहे.

धर्माच्या क्षेत्राचा या अदृश्य विभागाशीं पुष्कळच संबंध येत असतो. भगवद्गीतेंत सांगितलें आहे ( १५·८ ) कीं वारा जसा फुलांचा सुगंध घेऊन अंतरावर जातो त्याप्रमाणें मरतेवेळीं माणसाचा जीवात्मा, इंद्रियें व मन यांना घेऊन देहाबाहेर अंतरावर जातो. पण ही गोष्ट आपणांला दिसत नाहीं. मृत्यूनंतर माणूस नरकांत वा स्वर्गांत जातो अशी हिंदु-धर्माची शिकवण आहे. पण हे स्वर्ग व नरक आपणांला दिसत नाहींत. माणसाच्या सद्विचारांचा व दुर्विचारांचा परिणाम त्याच्या स्वतःवर होतो

आणि सभोंवतालच्या लोकांवरहि होतो असें धर्माचें सांगणें आहे आणि म्हणूनच दुसऱ्याचें वाईट चिंतू नये असा नीतिनियम धर्मानें घालून दिलेला आहे. पण मनांत विचार आल्यावर त्याची प्रक्रिया काय होते, त्या विचाराचा दुसऱ्या माणसांवर कसा काय परिणाम होतो, विचार अंतरावर कसे जातात, हें माणसाला दिसत नाहीं.

या सर्व गोष्टी अज्ञेय आहेत असें पुष्कळांना वाटतें. पण तें खरें नाहीं; आपणांला सृष्टीचा कांहीं भाग आपल्या इंद्रियांनीं दिसतो. बाकीचा भाग दिसत नाहीं याचें कारण आपल्या इंद्रियांची शक्ति मर्यादित आहे हें होय. माणसाला डोळा, कान, नाक वगैरे इंद्रियें आहेत. मन, बुद्धि, प्रतिभा वगैरे शक्ति आहेत. हीं इंद्रियें व या शक्ति मर्यादित आहेत म्हणून सृष्टींतल्या सर्व चिजा आपणांला दिसत नाहींत व आकलन होत नाहींत. हीं इंद्रियें व या शक्ति कायम ठशाच्या आहेत असें आपण मानतों. पण तें चूक आहे. सृष्टींतल्या सर्व गोष्टींना वाढ आहे, विकास आहे, तसा याही गोष्टींना विकास आहे हें सिद्ध झालेलें आहे. आंधळ्या लोकांकरितां जीं पुस्तकें छापलेलीं असतात त्यांत शाईनें छापलेलीं अक्षरें नसतात. भाजलेल्या पापडावर जसे बारिक बारिक फोड असतात तशी कागदावरच्या उंचवट्याची एक लिपी आहे. त्या पुस्तकांत ती लिपी असते. आपण त्या लिपीवरून बोट फिरविलें तर कांहीं तरी खडबडीत भाग आपल्या बोटास जाणवेल. पण आंधळ्या माणसाला असल्या खडबडीत भागावरून बोट फिरविण्यास शिकविलें तर हळूहळू त्याच्या बोटांतील ज्ञानतंतू अधिक कुशाग्र व नाजुक होतात. त्यांची ग्रहणशक्ति वाढते आणि त्यामुळेंच तो आपल्या बोटांच्या टोंकांनीं ती लिपी वाचूं शकतो. एखाद्या माणसाला मेस्मेरिझमच्या निद्रेंत घातलें तर योग्य प्रयत्नानें त्याच्या इंद्रियांची शक्ति वाढवितां येते. जागेपणीं ज्या माणसाला एखाद्या घड्याळाची टिकटिक फक्त वीस फुटांवरून ऐकूं येत होती, त्याला ती असल्या निद्रेंत चाळीस फुटांवरूनही ऐकूं येते, ज्या जुन्या गोष्टींचें जागेपणीं त्याला स्मरण नव्हतें त्या गोष्टी

असल्या निद्रेंत त्याला बरोबर आठवूं लागतात. शास्त्रज्ञांनीं हे प्रयोग केलेले आहेत. त्यांवरून दिसून येतें कीं माणसाच्या इंद्रियांच्या व मनाच्या शक्ति कायम ठशाच्या नसतात. त्यांची वाढ होऊं शकते.

माणसाच्या इंद्रियाच्या व मनाच्या शक्तींचा विकास करण्याचें एक शास्त्र आहे. त्या शास्त्राला राजयोग म्हणतात. सृष्टिक्रमानुसार उत्क्रांति-प्रवाहांत सर्व माणसांच्या सर्व शक्तींचा विकास हळूहळू व्हावयाचा आहे. राजयोग शिकल्यास ही वाढ जलद करतां येते. जर एकाद्या माणसानें राजयोगाचा पद्धतशीर अभ्यास केला तर त्याच्या इंद्रियांना व मनाला आज जी शक्ति, जें सामर्थ्य, जी कुवत, नाहीं ती शक्ति, तें सामर्थ्य, ती कुवत, उत्पन्न होते. जें सामर्थ्य आज बहुजन समाजाच्या इंद्रियांना नाहीं, जें हळूहळू उत्क्रांति–प्रवाहांत त्यांना येणार आहे तें राजयोग्याला आज मिळालेलें आढळतें. असल्या सामर्थ्याला राजयोगांत 'सिद्धी' असें नांव आहे. ज्याला असल्या सिद्धी प्राप्त झालेल्या असतील, अन्य शब्दांनीं सांगावयाचें झाल्यास, ज्याच्या इंद्रियशक्ति कुशाग्र झालेल्या असतील, त्याला अदृश्य सृष्टि प्रत्यक्ष जाणवते व दिसते आणि त्या अदृश्य सृष्टींतल्या नाना चिजा व नाना प्रक्रिया त्याला पहातां येतात, पुनः पुनः व बारकाईनें पहातां येतात व शास्त्रज्ञ जसें दृश्यसृष्टीचें संशोधन करतो तद्वत् राजयोगी अदृश्य सृष्टीचें संशोधन करूं शकतो.

जगांतील सर्व धर्म असल्या संशोधनापासूनच निर्माण झालेले आहेत. धर्माची जी नवीन मांडणी थिऑसफीनें केली आहे तींत असलें संशोधन प्रमुख आहे व राजयोग शिकून थिऑसफीय पुढाऱ्यांनीं तें संशोधन केलेलें आहे. या दृष्टीनें पाहिल्यास थिऑसफी म्हणजे एक सायन्स आहे असें म्हणतां येईल.

## थिऑसफिकल सोसायटीचे उद्देश

थिऑसफीचा प्रसार करण्याकरितां थिऑसफिकल सोसायटी स्थापन झालेली आहे. थिऑसफिकल सोसायटीचे तीन उद्देश आहेत. ते असेः—

१ जात, धर्म, लिंग, वर्ण, इत्यादि भेद बाजूला ठेवून मानव जातीच्या बंधुत्वाचा केंद्र बनवणें.

२ धर्म, तत्त्वज्ञान व भौतिक शास्त्रें यांच्या तुलनात्मक अध्ययनास उत्तेजन देणें.

३ अज्ञात सृष्टिनियम व मनुष्याच्या अंतरंगांत असलेल्या गूढ शक्ति यांचें संशोधन करणें.

या तीन उद्देशांचा थोडा विचार करूं म्हणजे थिऑसफीची अधिक स्पष्ट व व्यवस्थित कल्पना आमच्या वाचकांना येईल. जग पुष्कळ रीतींनीं सुधारलें पाहिजे, त्यांत मोठ्या प्रमाणावर उच्च प्रकारची संस्कृति आली पाहिजे, ती संस्कृति आणण्याकरितां नवीन ध्येयें, नवीन भावना, नवीन महत्त्वाकांक्षा जनमनांत निर्माण झाल्या पाहिजेत. समाजांत नवीन आकांक्षा तीव्रपणानें निर्माण झाल्या म्हणजे मग लोक त्या आकांक्षांस अनुरूप अशीं साधनें, समाजव्यवस्था व संस्था आपोआप निर्माण करतात. वरील उद्देशांत सर्व जगभर नवीन आकांक्षांस चालना देण्याचें धोरण आहे. एकदां त्या आकांक्षांची पकड जनमनावर बसली म्हणजे लोक नवीन संस्कृतीचीं साधनें आणि नवीन समाजव्यवस्था आपण होऊन निर्माण करतील आज योग्य अशा नवीन आकांक्षा लोकांसमोर नाहींत. योग्य अशीं ध्येयें त्यांच्यासमोर कोणी ठेवलेलीं नाहींत. त्यामुळें लोकांचा घोटाळा झालेला आहे. इष्ट ध्येयांचें सुकाणूं त्यांच्या गलबताला नाहीं. त्यामुळें ते जगांत नानाप्रकारचें अव्यवस्थित उद्योग करीत असतात. ज्या भावना, जीं ध्येयें, जे विचार सामान्य दर्जाच्या माणसाला आज प्रेरणा देत असतात ते व्यक्तीला व जगाला सुसंस्कृत करण्याला उपयोगी नाहींत. सामान्य लोकांच्या मनांत ज्या भावना, जे पूर्वग्रह, ज्या वृत्ति दृढमूल झालेल्या आहेत, त्या बदलून नवीन आकांक्षा त्या ठिकाणीं निर्माण झाल्या तरच व्यक्ति सुधारेल आणि मग जग सुधारेल. त्यासाठीं वरील उद्देश थिऑसफिकल सोसायटीनें स्वतः समोर ठेविले आहेत.

पहिला उद्देश माणसामाणसांचे संबंध प्रेमाचे करण्याचा आहे. जगांत अनेक धर्म, अनेक वंश, अनेक जाति आहेत. त्यांमध्यें उच्चनीच भावाच्या कल्पना आहेत. गोऱ्या माणसाला काळ्या माणसाबद्दल तुच्छ-भाव वाटतो; सामान्यतः ब्राह्मणाला अस्पृश्यांबद्दल वाटतो. पुरुष स्त्रियांना कनिष्ठ मानतात. धर्म, जात, वंश, स्त्री–पुरुष व काळागोरा हे फरक गौण व कमी महत्त्वाचे मानावे, त्याबाबत जो उच्चनीचपणा जनतेला वाटतो तो कमी करावा, आणि सर्व माणसें बंधु आहेत ही भावना दृढ करावी. हें पहिल्या उद्देशाचें सांगणें आहे. अशी वृत्ति ठेवणाऱ्या माणसांचे गट सर्व जगभर निर्माण करावे म्हणजे धर्म, वर्ण वगैरेंचे कलह समाजांतून कमी होतील. असले भेद चुटकीसरसे समाजांतून नाहींसे होणार नाहींत. पण त्यांचें महत्त्व कमी कमी केलें, तशा बुद्धीनें वागणाऱ्या व्यक्तींचे संघ जगांत वाढले म्हणजे आजचीं वैमनस्यें कमी होऊन व्यक्ति व जग अधिक सुसंस्कृत बनेल. यासाठीं सोसायटीनें हा एक उद्देश आपल्या समोर ठेविला आहे.

धर्म तत्त्वज्ञान व भौतिक शास्त्रें यांचें तुलनात्मक अध्ययन करावें हें दुसऱ्या उद्देशांत सांगितलें आहे. सामान्यतः माणसाला स्वतःच्या धर्माबद्दलची काय ती माहिती असते. दुसऱ्याच्या धर्माबद्दल त्याला माहिती नसते. बहुशः त्याबद्दल प्रतिकूल ग्रह झालेला असतो. जर माणसानें सहानुभूतिपूर्वक व सत्य जिज्ञासेनें इतर धर्मांचा अभ्यास केला तर त्या धर्मांत त्या मुख्य गोष्टी आपल्या धर्मासारख्याच आहेत हें त्यास आढळतें. यासाठीं थिऑसफीकल सोसायटीनें हा उद्देश आपल्या संस्थेसमोर ठेविलेला आहे. असल्या अध्ययनानें माणसाचें स्वतःच्या धर्माबद्दल प्रेम कमी न होतां त्याला दुसऱ्याच्या धर्माबद्दल आदर वाटतो. जगांत निरनिराळीं भौतिकशास्त्रें आहेत. निरनिराळे तत्त्व-विचारही आहेत. त्यांचाही तुलनात्मक अभ्यास या उद्देशांत समाविष्ट आहे. भौतिक शास्त्रांचा अभ्यास करणें आज अत्यवश्यक झालें आहे. शहाणपणानें त्यांचा अभ्यास केला तर धर्म व भौतिक शास्त्रें यामध्यें विरोध नाहीं हें माण-

साला पटतें. निरनिराळया तत्त्ववेत्त्यांचे विचारही शहाणपणानें अभ्या-सले तर त्यांच्यामध्येंही सुसंगतपणा दिसतो. लहान मुलें ठोकळ्यावरील चित्रें योग्य प्रकारानें एकमेकांशीं जोडून जसें एक मोठें चित्र बनवतात तसें निरानिराळे तत्त्वविचार परस्परांशीं योग्य रीतीनें जोडून जीवनाचा एक सुसंगतपट निर्माण करतां येतो. धर्म, सायन्स व तत्त्वविचार हीं क्षेत्रेंही नीटपणानें परस्परांशीं जोडून एक सलग क्षेत्र निर्माण होऊं शकतें. तसें व्हावें म्हणून थिऑसफिकल सोसायटी या प्रकारच्या तुलनात्मक अध्ययनाला उत्तेजन देत असते.

अदृश्य सृष्टींचें संशोधन कसें करतात ती माहिती आम्हीं दिली आहे. मनुष्य व सृष्टि याविषयीं संगतवार माहिती मिळवून जर स्वतःला सुसंस्कृत व शहाणे बनावयाचें असेल तर नुसत्या दृश्य सृष्टीची माहिती पुरेशी नाहीं. जी अदृश्य सृष्टि आपणांसभोंवार विस्तरलेली आहे तिचीही माहिती माणसानें करून घेतली पाहिजे; तरच त्याला सबंध सृष्टीची कल्पना येईल व तो बुद्धीनें शहाणा व वर्तनानें चांगला होऊं शकेल. या-साठीं हा तिसरा उद्देश आहे.

## मतस्वातंत्र्य

थिऑसफीचा प्रसार सर्व जगभर व्यवस्थित रीतीनें व्हावा यासाठीं थिऑसफिकल सोसायटी स्थापिलेली आहे. अलीकडच्या काळाला शोभेल व जगाच्या आधुनिक आकांक्षांना जुळेल अशा रीतीची ह्या संस्थेची घटना करण्यांत आलेली आहे. जुन्या काळच्या ज्या धर्मसंस्था होत्या त्यांत जिज्ञासेला व अश्रद्धेला फारसा वाव नसे. अगोदर श्रद्धा ठेवल्याशिवाय त्या संस्थांत जातां येत नसे. आज जगांत अशीं शेंकडों बुद्धिमान् माणसें आहेत कीं, जीं अगोदर श्रद्धा ठेवण्यास तयार नाहींत. त्या बुद्धिमान् माणसांपैकीं ज्यांना ज्ञानलालसा आहे तीं माणसें आज असें म्हणत आहेत कीं, आम्ही चवकशी करूं, अभ्यास करूं, वादविवाद करूं, साधक बाधक प्रमाणें पाहूं व मग आम्हास जो सिद्धांत पटेल

त्यावर श्रद्धा ठेऊं. अमुक अमुक माणूस सांगतो म्हणून आम्ही श्रद्धा ठेवण्यास तयार नाहीं.

आजचे जगांतील धर्म किंवा धर्मपंथ पाहिले तर त्यांत अंधश्रद्धा फार मोठ्या प्रमाणावर दिसून येत आहे. हिंदु म्हणतो मी वेद मानतों, वेदांत जें सांगितलें आहे त्यावर माझी श्रद्धा आहे. पण पुष्कळ हिंदूंना वेद कशाशीं खातात त्याची माहिती नाहीं. मुसलमान म्हणतो मी कुराण पवित्र मानतों. कुराणांत जें सांगितलें आहे त्यावर माझा विश्वास आहे. पण तूं कुराण वाचलें आहेस का ? कुराणाची भाषा तुला समजते का ? कुराणांत काय लिहिलें आहे तें तुला ठाऊक आहे का ? असे प्रश्न केले तर बहुतेक मुसलमानांचें कुराणाचें ज्ञान आवळयाएवढें पूज्य आहे असें चवकशीअंतीं दिसून येईल. इतर सर्व धर्मांची स्थिति अशीच आहे. माझ्या धर्मग्रंथावर माझा विश्वास नाहीं असें प्रामाणिक बुद्धीनें व जाहीर रीतीनें सांगण्याची मुभा कोणत्याही धर्मानें आपल्या अनुयायांना दिलेली नाहीं. म्हणून धर्मग्रंथ न वाचतां, चवकशी व अभ्यास न करतां आमचा धर्मावर विश्वास आहे असें सर्व धर्मांचे अनुयायी म्हणत असतात. मात्र त्यांत जे जिज्ञासू, बुद्धिमान् व स्वतंत्र विचारांचे लोक आहेत त्यांची खरोखरी आपापल्या धर्मावर श्रद्धा नसते व त्यांपैकीं जे निर्भीड असतात ते कधीं कधीं आपलीं पाखंडी मतें स्पष्ट बोलून दाखवतातही. तें कसेंही असलें तरी विचार केल्याशिवाय श्रद्धा ठेवण्याचें वातावरण सर्व धर्मांनीं आपापल्या अनुयायांमध्यें प्रचलित केलें असल्यामुळें पुष्कळ लोकांमध्यें धर्मवेडेपणाचें व पुष्कळ लोकांमध्यें दांभिकपणाचें साम्राज्य आज सुरू आहे.

थिऑसफिकल सोसायटीला आपल्या संस्थेंत असल्या गोष्टी नको आहेत. म्हणून सोसायटींत संपूर्ण मतस्वातंत्र्य ठेवण्यांत आलेलें आहे. थिऑसफिकल सोसायटीच्या सभासदानें थिऑसफीवर विश्वास ठेवला पाहिजे असें सोसायटींत बंधन नाहीं. सभासद जिज्ञासू असले पाहिजेत,

त्यांनीं चवकशी करावी, अभ्यास करावा, नाना मतें धुंडाळावीं, गूढ-प्रश्नांचें मनन करावें व मग आपलें मत ठरवावें अशी सोसायटीची अपेक्षा आहे. सभासदाच्या बुद्धीला जें पटत नसेल तें त्यानें मानूं नये, मला हें पटत नाहीं, माझ्या मतें हें चूक आहे असें सोसायटींत राहून म्हणण्याचें स्वातंत्र्य त्याला सोसायटीनें दिलेलें आहे. जी गोष्ट माणसाला खरोखरी पटलेली नाहीं ती मला मान्य आहे असें त्याच्याकडून वदविण्यांत कांहींच अर्थ नाहीं. त्यानें दंभ निर्माण होतो, खरी जिज्ञासा बोथट होते, व स्वतःच्या मतानुसार आचरण करण्याचा उत्साह नाहींसा होतो. सोसायटीला प्रामाणिक व उत्साही सभासद हवे आहेत. संपूर्ण विचार-स्वातंत्र्य दिल्याशिवाय तें शक्य नाहीं.

एकादी लौकिक गोष्ट सत्य असली आणि एकाद्या व्यक्तीला ती प्रामाणिकपणानें खरी वाटत नसली तर आपण त्या माणसावर रागावत नाहीं, किंवा त्याच्यावर बहिष्कार घालीत नाहीं. आपण त्याला त्या गोष्टीची माहिती देतों. तिच्या खरेपणाचीं प्रमाणें त्याच्या समोर ठेवतों, त्याची जिज्ञासा जागृत करून तूं शोध कर, विचार कर, चवकशी कर, मनन कर असें त्यास सांगतों. जर ती गोष्ट खरी आहे तर आज ना उद्यां ती त्याला सांपडेल व पटेल असें आपण धरून चालतों आणि खरोखरी ती न सांपडली, न पटली तर ती त्याच्या माथीं मारण्यांत अर्थ नाहीं, हें ओळखतों. थिऑसफिकल सोसायटीचें धोरण अशा प्रकारचें आहे. सोसायटी सभासदांची जिज्ञासा जागृत करते, अभ्यासाची हौस त्यामध्यें निर्माण करते, त्यांच्या समोर निरनिराळ्या प्रकारचें उत्कृष्ट वाङ्मय ठेवते, पण तूं अमकें मान किंवा अमकें मानूं नको अशा प्रकारची जबरी त्याच्यावर करीत नाहीं. जबरीनें लादलेल्या मतांची किंमत शून्य होय.

पण माणसांचीं मतें जरी वेगळीं असलीं, एका सभासदाचें मत जरी दुसऱ्याच्या उलट असलें, तरी तीं मतें बोलण्याच्या बाबतींत, सदभि-

रुचीचें उल्लंघन होतां कामा नये, कटु वाणीनें दुसऱ्या माणसाच्या मनावर हल्ला करतां कामा नये, अशी सोसायटीची सर्व सभासदांना शिफारस आहे. सभासदांना आपलीं मतें मांडण्याचा हक्क आहे, दुसऱ्याचीं मतें चूक आहेत असें म्हणून त्यांवर विचारपूर्वक टीका करण्याचाही हक्क आहे, पण शिव्या देण्याचा हक्क नाहीं. या धोरणामुळें जरी सोसायटींत मतवैचित्र्य असलें तरी भांडणें वाढत नाहींत.

माणसाला मतस्वातंत्र्य दिलें तरच त्याच्या बुद्धीची वाढ होते हें सोसायटीनें ओळखलेलें आहे. सोसायटीला समर्थ, बुद्धिमान् व स्वतंत्र विचाराचे सभासद हवे आहेत. अशा लोकांनीं विचारपूर्वक श्रद्धा ठेविली व विचारपूर्वक आपलीं मतें बनविलीं तर तीं मतें व ती श्रद्धा यांत जिवंतपणा राहील असें सोसायटीस वाटतें. जगांत भविष्य काळीं पुष्कळ नवीन विचार यावयाचे आहेत, त्या नवविचारांत जें सत्य असेल तें सोसायटीला हवें आहे. जगासमोर भविष्यकाळीं आध्यात्मशास्त्राचे, राजकारणाचे, अर्थशास्त्राचे, समाजशास्त्राचे, शिक्षणशास्त्राचे नाना कूटप्रश्न उभे राहावयाचे आहेत, ते प्रश्न सोडवायला विचारस्वातंत्र्याचें मोकळें मैदान हवें आहे आणि म्हणूनच सोसायटीमध्यें मतस्वातंत्र्यास संपूर्ण वाव दिलेला आहे. सांचिक पाणी घाणेरडें होतें, त्यांत शेवाळ धरतें, तें पिण्याला निरुपयोगी होतें. सोसायटी नवविचारांच्या सांचलेल्या पाण्याच्या डबक्यासारखी होऊं नये, अशी पुढाऱ्यांची इच्छा असल्यामुळें हल्लींच्या युगधर्मास धरून सोसायटी मतस्वातंत्र्यास उत्तेजन देत असते.

पण सोसायटींत सर्वांसच स्वातंत्र्य आहे, हें विसरतां कामा नये. पुष्कळ संस्थांत फक्त पाखंडी लोकांसच मतस्वातंत्र्य असतें, अमुक एक श्रद्धेची गोष्ट चुकीची आहे असें प्रतिपादण्याचें स्वातंत्र्य असतें, पण श्रद्धावान् माणसाला आपलीं मतें मांडण्याचें, श्रद्धा ठेवणें बरोबर आहे, असें म्हणण्याची अडचण असते. ह्या सोसायटींत अश्रद्धावान् माणसांना

जसें स्वातंत्र्य आहे, तसें श्रद्धावान् माणसांनाही स्वातंत्र्य आहे हें लक्षांत ठेविलें पाहिजे. सोसायटी जगभर पसरलेली असल्यामुळें तींत सर्व देशांतील, सर्व धर्मांतील, सर्व संस्कृतींतील माणसें येणारच. तेव्हां या सर्वांना आपापल्या वृत्त्यनुसार वागण्याचें स्वातंत्र्य आहे. सर्व माणसें एका छापाच्या गणपतीसारखीं बनावीं असें सोसायटीचें धोरण नाहीं. सर्व प्रकारच्या माणसांना, कर्मकुशल माणसांना, कलाप्रेमी माणसांना आपापल्या वेगळया मार्गानें जाण्याचें उत्तेजन सोसायटींत मिळत असतें. असल्या वैचित्र्यानें सोसायटी ऐश्वर्यवान् व श्रीमंत होईल असें सोसायटीच्या पुढाऱ्यांचें म्हणणें आहे.

## थिऑसफिकल सोसायटीची घटना.

थिऑसफीचा प्रसार करण्याकरितां ही जी थिऑसफिकल सोसायटी स्थापण्यांत आलेली आहे ती मुळांत मॅडम् ब्लॅव्हट्स्की नांवाची एक राशियन स्त्री व कर्नल ऑलकॉट नांवाचे एक अमेरिकन गृहस्थ यांनीं १८७५ सालीं अमेरिकेंत स्थापिली. आज ती जगांतल्या बहुतेक सर्व सुधारलेल्या देशांत पसरलेली आहे. तिचें आंतरराष्ट्रीय आद्यपीठ मद्रास जवळ अड्यार येथें आहे. दर देशांत त्या त्या देशाचें मुख्य ठिकाण असतें व त्याच्या पोटांत त्या त्या देशांतील निरनिराळया ठिकाणच्या थिऑसफीय शाखा येतात. हिंदुस्थानचें मुख्य केंद्र काशी येथें आहे. हिंदुस्थानांत अनेक भाषा असल्यामुळें थिऑसफीच्या कामाकरितां भाषावार प्रांतरचना करण्यांत आलेली आहे. मराठी बोलणाऱ्या सभासदांच्या ठिकठिकाणच्या सर्व शाखा **मराठी थिऑसफिकल फेडरेशन** या संस्थेमध्यें एकत्रित केलेल्या आहेत. त्याचप्रमाणें गुजराथी थिऑसफिकल फेडरेशन, तामीळ थिऑसफिकल फेडरेशन, वगैरे फेडरेशन्स त्या त्या भाषांसाठीं आहेत. प्रत्येक देशाच्या थिऑसफीय भागाला नॅशनल सोसायटी किंवा सेक्शन असें नांव आहे. उदाहरणार्थ हिंदुस्थानच्या व इंग्लंडांतल्या थिऑसफीय विभागांना अनुक्रमें Indian

Section किंवा Indian National Society व English Section अथवा English National Society अशीं नांवें आहेत. प्रत्येक देश थिऑसफीच्या कामाबाबत स्वतंत्र असतो. दर वर्षी प्रत्येक देशांतील सभासद आपल्यामधील एका माणसाला निवडून देतात व त्याच्या देखरेखीखालीं त्या त्या देशांतील थिऑसफीय काम चालतें. या निवड-लेल्या व्यक्तीला जनरल सेक्रेटरी म्हणतात. जगांतील सर्व जनरल सेक्रेट-रींची एक समिति आहे. तिला जनरल काउन्सिल म्हणतात. हें काउन्सिल व थिऑसॉफिकल सोसायटीचा अध्यक्ष अशीं दोघें थिऑसफिकल सोसायटीचें जगांतील काम चालवितात. अध्यक्ष जगांतील सभासदांनीं निवडलेला असतो. ही निवडणूक दर सात वर्षांनीं होते. थिऑसफिकल सोसायटीचे पहिले अध्यक्ष कर्नल ऑलकॉट हे होते. त्यांच्या मागें डॉ. बेझंट निवडण्यांत आल्या. नंतर डॉ. ॲरंडेल अध्यक्ष झाले. शेवटची निवडणूक १९४५ सालीं झाली व तींत मि. सी. जिनराजदास हे निवडून येऊन सध्यां अध्यक्षपदावर आहेत.

थिऑसफिकल सोसायटींमध्यें जनरल सेक्रेटरी, अध्यक्ष वगैरे जीं पदाधिकारी माणसें असतात तीं फक्त कामकाजाची व्यवस्था पाहातात. सभासदांस संपूर्ण मतस्वातंत्र्य असल्यामुळें सभासदांच्या मतांवर, श्रद्धेवर वा अश्रद्धेवर त्यांना हुकमत चालविण्याचा अधिकार नाहीं.

सभासदांना सभासदत्वाची कांहीं वर्गणी द्यावी लागते. ती वर्गणी दर देशांत वेगळी असून त्या त्या देशांत जमा होत असते. तिचा कांहीं अंश अड्यारच्या आद्यपीठाकडे जातो. या वर्गणींतून थिऑसफिकल सोसायटीचें प्रचारकार्य चालतें. पुष्कळदां ही वर्गणी अगदीं थोडी असून थिऑसफीच्या कामासाठीं सभासदांनीं आपखुषीनें देणग्या देणें अवश्य होतें. असल्या सर्व गोष्टींत प्रत्येक प्रदेश स्वतंत्र असल्यामुळें दर देशांतले याबद्दलचे नियम व व्यवस्था वेगळी असते व एका देशाची हुकमत दुसऱ्या देशावर चालत नाहीं.

थिऑसफिकल सोसायटींतील बहुतेक सव पदाधिकारी विनावेतनें काम करतात. थिऑसफिकल सोसायटींतील पदाधिकारी सभासदांनीं बहुमतानें निवडलेले असल्यामुळें सोसायटीचें काम लोकशाहीच्या धोरणानें चालतें हें स्पष्ट आहे. पण जगांतील अनेक लोकशाही संस्थांत पदाधिकारी कोणी व्हावें, कोणी कोणावर किती अधिकार चालवावा, सभासदाची वर्गणी किती असावी, कोणता ठराव पास व्हावा असल्या गोष्टींत अवास्तव महत्त्व येतें, निवडणुकींवर रणें माजतात व भांडणें होऊन संस्थेचें सारें कार्य मागें पडतें. थिऑसफिकल सोसायटीचे जे पुढारी आहेत त्यांनीं सोसायटी चालविण्याचें जें धोरण आजवर सभासदां-समोर ठेविलें आहे. त्यांत या गोष्टींवर फारसा जोर न देतां सोसायटीचे उद्देश व कार्य यांवर जोर दिलेला आहे; आणि म्हणून या कामकाजाच्या निवडणुकींच्या, पक्षोपपक्षांच्या गोष्टींत सामान्यतः सोसायटींत अवास्तव महत्त्व दिलें जात नाहीं. त्यामुळें लोकशाहीचे फायदे या संस्थेस मिळतात व लोकशाहीच्या तोट्यांची तादृश बाधा सोसायटीला होत नाहीं.

सोसायटीमध्यें संस्थेच्या नियमांपेक्षां ध्येयांना अधिक महत्त्व द्यावें अशी प्रथा आहे. एक नवीन दृष्टि जगासमोर ठेवावी हें सोसायटीचें काम आहे. ती दृष्टि लोकांना पटेल व आवडेल अशा रीतीनें जगासमोर ठेविली पाहिजे. संस्थेंत निरनिराळ्या नियमांचें जाळें पसरून हें कार्य होणार नाहीं. सभासदांना ध्येयांची स्फूर्ति देऊन व जगांत नवीन संस्कृति पसरण्याची हौस उत्पन्न करून हें कार्य तडीस जाईल. तेव्हां थिऑस-फिकल सोसायटीची संस्था चालविण्यासाठी जरी संस्थेचे नियम, तिची रचना–घटना, तिच्यामधील पदाधिकारी व त्यांच्या निवडणुकी यांची गरज असली तरी तिचें कार्य जगांत यशस्वी होण्यासाठीं ध्येयनिष्ठ, स्वार्थत्यागी, शीलवान्, उदारबुद्धीचे सभासद तिला मिळाले पाहिजेत या गोष्टीची जरूरी अधिक आहे. सोसायटीच्या पुढाऱ्यांनीं त्या दृष्टीनें सोसायटीचा गाडा आजवर चालविलेला आहे.

सोसायटीचें कार्य जगांत पसरण्यासाठी थिऑसफीची नाना क्षेत्रां-संबंधाबद्दलची विचारसरणी सर्व जगभर प्रसृत झाली पाहिजे. प्रमुखतः हा उद्योग आपल्या सभासदांच्या द्वारानें ही सोसायटी करते. सभासदांनीं थिऑसफीच्या वाङ्मयाचा चांगला अभ्यास केला पाहिजे, परोपकाराची व **लोकसंग्रहाचीं** कामें अंगावर घेतलीं पाहिजेत, सद्वर्तनी, शीलवान् व ध्येयनिष्ठ बनून इतरांस धडा घालून दिला पाहिजे अशी सोसायटीची अपेक्षा असते. अर्थात् जरी सोसायटीला पुष्कळ सभासद् हवे असले तरी उगीच खोगीरभरती होऊं नये यासाठीं लोकांना पैठणी आग्रह करून आंत ओढण्याचा प्रचार सोसायटी करीत नाहीं. सर्वांना सोसायटीचा दरवाजा खुला आहे. ज्यांना सोसायटीच्या कार्याबद्दल हौस व प्रेम वाटत असेल त्यांनीं सभासद् होऊन सोसायटींत यावें व कामास हातभार लावावा, ज्यांना हौस वाटत नसेल त्यांनीं सोसायटीचें वाङ्मय वाचावें, तींतिल संशोधनकार्याची माहिती करून घ्यावी, थिऑसफीचा जितका भाग पटेल तितका घ्यावा व तो आचरणांत आणावा आणि अशा रीतीनें स्वतःची व जगाची सुधारणा करावी अशी सोसायटीची अपेक्षा आहे.

## थिऑसफीचें वाङ्मय

गेल्या पाऊणशें वर्षांत जगांत जें वाङ्मय प्रसिद्ध झालेलें आहे त्यांत थिऑसफीच्या वाङ्मयाचा दर्जा फार उच्च प्रकारचा लागेल. तें वाङ्मय संशोधनात्मक असल्यामुळें सायन्सच्या वाङ्मयासारखें आहे, अर्थात् सायन्सच्या वाङ्मयासारखी निश्चितता त्यांत आलेली आहे. जुन्या काळीं धर्माच्या क्षेत्रांत जे विषय येत त्यांचें संशोधनात्मक वर्णन या वाङ्मयांत आहे. त्यामुळें जगांतिल निरानिराळ्या धर्मांचें हृद्गत समजण्याला या वाङ्मयाचा पुष्कळ उपयोग होण्याजोगा आहे. जगांतील धर्म आज जरी अवनत झालेले असले तरी मूळांत ते सारे धर्म संशोधनावर आधारलेले आहेत. म्हणूनच ते सर्व खरे आहेत, आणि म्हणूनच मह-

त्याच्या सर्व मुद्यांसंबंधाची सर्व धर्मांची मूळची शिकवण सारखी आहे. असें या थिऑसफीय वाङ्मयाचें सांगणें आहे.

## थिऑसफीची व्याख्या

सर्व धर्मांत सारखा असलेला जो हा मुख्य भाग त्यालाच कित्येक लोक 'थिऑसफी' असें नांव देत असतात. या दृष्टीनें पाहिल्यास सर्व धर्मांतील सर्वसामान्य शिकवण म्हणजे 'थिऑसफी' होय अशी थिऑसफीची एक व्याख्या होऊं शकेल. अर्थात् थिऑसफीच्या अभ्यासानें प्रत्येक माणसाला आपापला धर्म अधिक चांगल्या प्रकारानें समजतो आणि स्वतःच्या धर्मावरचा आदर कायम राहून दुसऱ्यांच्या धर्माविषयींही सहिष्णुता वाटूं शकते. अशा प्रकारची वृत्ति जगांत फैलावणें आज अत्यावश्यक झालें आहे.

भगवद्गीता, उपनिषदें, त्रिपिटक, बायबल, गाथा, कुराण वगैरे जे निरनिराळ्या धर्मांचे आकर ग्रंथ आहेत, तींत थिऑसफीचें मूळ आहे असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. थिऑसाफिकल सोसायटी स्थापल्यानंतर थिऑसफीचे अनेक अमोलिक ग्रंथ प्रसिद्ध झालेले आहेत. मॅडम ब्लॅव्हट्स्की नामक ज्या रशियन बाईनीं थिऑसाफिकल सोसायटी स्थापिली त्यांनीं The Secret Doctrine म्हणजे 'गूढविद्या' नांवाचा एक ग्रंथ लिहिलेला आहे. याचे ६ खंड असून पृष्ठें दोन हजार आहेत. अलीकडच्या थिऑसफीय वाङ्मयांत हा ग्रंथ फार महत्त्वाचा असा मानला जातो. थिऑसाफिकल वाङ्मयांत डॉ. ॲनी बेझंट, मि. लेडबिटर, मि. जिनराजदास, डॉ. ॲरंडेल वगैरे थिऑसफीय पुढाऱ्यांनींही अनेक उत्कृष्ट ग्रंथांची भर घातली आहे.

अलीकडच्या थिऑसफीय वाङ्मयांत कांहीं मुद्दे स्पष्टपणें मांडलेले आढळतात. त्यांचा येथें थोडासा उल्लेख करणें जरूर आहे. थिऑसफीचा एक मुद्दा असा आहे कीं आज जगांत उत्क्रांतिपथाच्या निरनिराळ्या टप्प्यांवर असणारीं सर्व दर्जाचीं माणसें जशीं अस्तित्वांत आहेत,

म्हणजे मानवी उत्क्रांतीच्या आरंभींच्या पायऱ्यांवरून चालत असणारीं सामान्य योग्यतेचीं माणसें आहेत, त्याच्याही पुढें गेलेलीं सुसंस्कृत व बुद्धिमान माणसें आहेत आणि त्यांच्याही पुढें असलेलीं अलौकिक व प्रतिभावान् माणसें जगांत विद्यमान आहेत तद्वत् मानवी उत्क्रांतिपथाचा शेवटचा टप्पा गांठलेलीं, मानवी विकासाचा उच्चांक गांठून सर्व बाबतींत संपूर्ण गुणविकास झालेलीं श्रीकृष्ण, गौतमबुद्ध यांसारखीं माणसेंही हल्लीं पृथ्वीवर अस्तित्वांत आहेत.

## ऋषि–संघ

या माणसांचा एक संघ असून तो सामान्य लोकांस न समजणारे असे उच्च दर्जाचे अनेक उद्योग जगद्हितार्थ करीत असतो. या संघांतील कांहीं पुरुष, जिज्ञासू व होतकरू व्यक्तींस हातीं धरून, त्यांस उत्क्रांति-मार्गावरून पुढें जाण्याच्या कामीं आजही सहाय्य करण्यास तयार असतात. मानवी उत्क्रांतीचें शिखर गांठलेलीं ऋषितुल्य माणसें पूर्वीं होतीं तशीं आजही पृथ्वीवर आहेत, पूर्वीं जसे ते कांहीं व्यक्तींस शिष्य म्हणून स्वीकारीत तसे आजही स्वीकारतात असें थिऑसफीचें सांगणें आहे. हा जो ज्ञानी पुरुषांचा संघ आहे त्याला कधीं कधीं ‘ ऋषिसंघ ’ असें नांव देण्यांत येतें. आपल्या ह्या पृथ्वीवरील सर्व जीवांच्या उत्क्रांतीवर त्या ऋषिसंघांची देखरेख असते, मानवी उत्क्रांतीची कांहीं योजना या संघानें आंखलेली असते, जगांत निरानिराळे धर्म स्थापणें, निरनिराळ्या सांस्कृतिक चळवळी निर्माण करणें, राष्ट्रांचे व संस्कृतींचे उदय व अस्त करणें, जगांत निरानिराळ्या वंशांचीं माणसें निर्माण करणें, इतिहासाच्या रंगभूमीवर निरनिराळीं प्यादीं हलवून मानवी उत्क्रांति साधणें या गोष्टी तो संघ आपल्या योजनेनुसार जगांत घडवून आणीत असतो. थिऑसफीच्या वाङ्मयांत या मुद्यासंबंधें जिज्ञासूंना पुष्कळ अधिक माहिती मिळण्याजोगी आहे.

## कांहीं सिद्धांत

थिऑसफीनें जीवनाविषयींचे अनेक सिद्धांत जगासमोर नवीन रीतीनें मांडले आहेत. त्यांपैकीं कांहींचें दिग्दर्शन येथें करूं या. मनुष्य मेल्यावर त्याचा सर्व कारभार आटोपतो, कीं त्याचा कांहीं अंश तसाच शाबूत रहातो हा मानवी जीवनांतला एक महत्त्वाचा प्रश्न आहे. त्या प्रश्नाचा विचार अलीकडच्या काळीं चमत्कार-संशोधन ( Psychical Research ); परलोकविद्या ( spiritualism ); व थिऑसफी या तीन क्षेत्रांत करण्यांत आलेला आहे. जे आकस्मिक चमत्कार घडतात त्यांत मरणोत्तर अस्तित्वाचा पुरावा कितपत सांपडतो त्याचें संशोधन चमत्कार-संशोधनाच्या क्षेत्रांत करण्यांत येतें. मृत माणसें व जिवंत माणसें यांमध्यें संबंध जोडून मृतांचे संदेश जिवंत माणसांना आणून देणें हें कार्य परलोकविद्येच्या क्षेत्रांत चालतें. हीं दोन्ही कार्यें महत्त्वाचीं आहेत. पण थिऑसफीचा उद्योग वेगळ्या तऱ्हेचा आहे व तोही अत्यंत महत्त्वाचा आहे. आपली पहाण्याची शक्ति वाढवून व मृत माणसें ज्या अदृश्य परिस्थितींत असतात ती परिस्थिति प्रत्यक्ष पहाण्याची कुवत आपल्या इंद्रियांमध्यें उत्पन्न करून मृत म्हणजे काय, मृत्यूच्या वेळीं काय क्रिया होत असतात,

### मरणोत्तर स्थिति कशी असते

मरणोत्तर मृतात्मे कोठें असतात, काय करतात, त्यांना कितपत सुखदुःख भोगावें लागतें या गोष्टींची तपशिलवार, सुसंगत व संशोधनात्मक माहिती थिऑसफीय पुढाऱ्यांनीं मिळविलेली आहे व त्यांनीं ती व्यवस्थितपणें जगासमोर ठेवलेली आहे. ती हिंदुधर्मांतल्या ( व इतर धर्मांतल्याही) माहितीस दुजोरा देत आहे. मरणोत्तर जीव शाबूत असतो हें त्या माहितीवरून सिद्ध होत आहे. ही माहिती नवीन रीतीनें मांडलेली असल्यामुळें धर्मग्रंथ वाचतांना ज्या मनांत शंका येतात त्या फिटण्याची सोय या माहितींत झालेली आहे. मृत्यु ही मानवी उत्क्रांतीला पोषक

अशी गोष्ट आहे. मृत्यूनंतर जीव वेगळया स्थितींत जातो, गतायुष्यांत जे नानाप्रकारचे अनुभव माणसानें घेतलेले असतील ते पचवून अंगीं लावावे व अशारीरीतीनें उत्क्रांतिदृष्ट्या त्याची प्रगति व्हावी हें मरणोत्तर स्थितीचें कार्य आहे असें या माहितीवरून ठरतें. या शिकवणीनें माणसाचें मृत्युविषयक दुःख व भय पुष्कळच कमी होऊन त्याच्या अंतर्यामीं आत्मविश्वासाची मुहूर्तमेढ निर्माण होते.

## पुनर्जन्म

माणूस पुनः पुनः जन्म घेतो कीं काय? या प्रश्नाबाबतही थिऑसफींत संशोधन झालेलें असून हिंदुधर्मास त्या संशोधनाचा दुजोरा मिळत आहे, दर जन्मीं प्रगति करायची, दोषांचें निर्मूलन व गुणांचा विकास करावयाचा; निरनिराळया प्रकारची योग्यता वाढवावयाची, अशाकरितां माणसाला एकामागून एक असे जन्म येत असतात आणि पुष्कळ जन्म घेऊन माणूस परिपूर्णावस्थेस पोहोंचत असतो हें थिऑसफीय संशोधनावरून दिसून येतें. उत्क्रांतीचें परमोच्च शिखर गांठतां येण्यासाठीं माणसाला अनेक जन्मांचा काल दिलेला आहे. रानटी स्थितीपासून निघून श्रीकृष्ण-बुद्ध यांच्या इतका श्रेष्ठपणा मिळविण्याचा उद्योग एका जन्मांत संपत नाहीं. म्हणून ईश्वरानें ( सृष्टीनें म्हणा हवें तर ) अनेक जन्मांची सोय केलेली आहे. थिऑसफीय संशोधकांनीं कित्येक व्यक्तींचे पूर्वीचे जन्म बारकाईनें तपासून ती माहिती प्रसिद्ध केली आहे. तीवरून पाहतां असें दिसून येतें कीं, माणूस अनेकदां पुरुषांचे जन्म घेतो, अनेकदां स्त्रीचे घेतो, तो नाना परिस्थितींत, नाना देशांत, नाना वंशांत, नाना संस्कृतींत जन्म घेऊन येतो आणि अशा रीतीनें त्याच्या स्वभावांच्या निरनिराळया बाजूंचा विकास होत असतो. एकाद्या शाळेंत जसे ड्राइंगचा वर्ग, गायनाचा वर्ग, सायन्सचा वर्ग, गणिताचा वर्ग, इतिहासाचा वर्ग वगैरे वर्ग असतात आणि प्रत्येक वर्गांत विद्यार्थी वेगवेगळे धडे शिकतात त्याप्रमाणें पृथ्वीवरील नाना देश,

नाना वंश, नाना संस्कृति हे ईश्वराच्या शाळेंतलें विशिष्ट शिक्षण देणारें वेगळे वर्ग आहेत, असें या संशोधनावरून दिसून येतें. हे अनेक जन्म घेत असतांना माणूस कधीं सुख भोगतो, कधीं दुःख भोगतो. सुखानें तो एकप्रकारचे धडे शिकतो, दुःखानें दुसऱ्या प्रकारचे धडे शिकतो. सृष्टींत जें

## दुःख आहे तें सारें शिक्षणात्मक आहे,

हें पुनर्जन्मविषयक थिऑसफीय संशोधनावरून स्पष्ट होतें. दर जन्मीं माणसाला वेगवेगळी परिस्थिति मिळते. ती परिस्थिति अशी असते कीं त्या परिस्थितींत त्याची उत्क्रांति व प्रगति होण्याला संपूर्ण वाव मिळावा. उत्क्रांतिमार्गावर माणसाला जबाबदारीची जाणीव येणें अत्यवश्यक आहे. ईश्वराच्या ह्या जगद्रूपी शाळेंत तो जीवरूपी विद्यार्थी शिकून शहाणा व्हावयाचा आहे व म्हणूनच त्याला चांगलें वाईट निवडण्याची विवेचक बुद्धि येणें अवश्य आहे. वाईट वर्तन करण्याची मुभा असूनही मला तें वाईट वर्तन करण्याची इच्छा नाहीं, मला सद्वर्तन हवें आहे असें म्हणणारी डोळस वृत्ति त्याच्या अंतर्यामांत बाणली पाहिजे. ही वृत्ति निर्माण होण्याकरितां

## कर्माचा नियम

सृष्टींत अनुस्यूत आहे. या कर्माच्या नियमासंबंधानें थिऑसफींत उद्बोधक विवेचन केलेलें आहे. प्रत्येक क्रियेचा ठराविक परिणाम होत असतो हें कर्माचा नियम शिकवतो. वाटेल त्या क्रियांचे वाटेल ते परिणाम सृष्टींत होत असतील तर माणसाला आपण केलेल्या कृत्याबद्दल जबाबदारीची जाणीव कधींही येऊं शकणार नाहीं. वाईट गोष्टी केल्या तर त्या गोष्टींचा परिणाम म्हणून करणाऱ्याच्या वांट्यास दुःख यावें, हा सृष्टिनियम आहे. त्याला कर्माचा नियम म्हणतात. माणूस वागण्याबाबत स्वतंत्र असतो. पण एकदां त्यानें एखादी गोष्ट केली कीं तिचे ठरीव परिणाम त्याला भोगावे लागतात.

हें सुखदुःखस्वरूपी परिणाम भोगूनच माणूस सद्-असद्-विवेक शिकतो आणि जबाबदारीची जाणीव मनांत ठेवून कोणती गोष्ट योग्य व कोणती गोष्ट त्याज्य तें ठरवितो व तदनुसार वागतो.

## उत्क्रांतिवादाची नवीन मांडणी

जगांत भौतिक शास्त्रज्ञांनीं जे शोध लावलेले आहेत ते शोध (शास्त्रज्ञांनीं गृहीत धरलेल्या उपपत्ति नव्हेत) थिऑसफीला मान्य असून थिऑसफीय वाङ्मयांत धार्मिक गोष्टी इतकेंच भौतिक शास्त्रज्ञांनीं शोधून काढलेल्या गोष्टींना महत्त्व देण्यांत येत असतें. इतकेंच नव्हे तर पुष्कळदां शास्त्रज्ञांच्या शोधांकडे थिऑसफी एका विशाल व सर्वग्राही दृष्टीनें पहात असते. उदाहरणार्थ, गेल्या शंभर वर्षांत, ज्या उत्क्रान्तिवादासंबंधानें शास्त्रज्ञांनीं बरेच प्रयोग व संशोधन केलेलें आहे त्याचा विचार करूं. या संशोधनामध्यें अदृश्य सृष्टीच्या संशोधनाची भर घालून उत्क्रान्तिवादाची एक सुंदर मांडणी थिऑसफींत करण्यांत आलेली आहे.

जीवशास्त्रज्ञांनीं (Biologists) शास्त्रीय प्रयोग करून व पुरावा गोळा करून उत्क्रान्तिवाद जगासमोर सिद्ध केलेला आहे. निरनिराळे प्राणी व निरनिराळया वनस्पति यांचें अवलोकन करून प्रत्येक प्राणी व प्रत्येक वनस्पति स्वतंत्र रीतीनें निर्माण झालेलीं नाहीं, एका प्राणिजातीमध्यें अथवा वनस्पतिजातीमध्यें पिढ्यानुपिढ्या फरक होत जातात व अशा रीतीनें प्राण्यांच्या व वनस्पतींच्या निरनिराळया जाति निर्माण होत असतात असा शास्त्रज्ञांचा उत्क्रान्तिवाद सांगतो. माणसाच्या व मानवसम वानराच्या शरीर साम्याकडे पाहून माकड व मनुष्य ह्या आरंभापासूनच्या वेगळया जाती नसून त्यांचा निकटचा संबंध आहे व एक दुसऱ्यापासून निर्माण झालेली आहे असें शास्त्रज्ञांचें म्हणणें आहे. सृष्टीमध्यें प्राणिकोटींत व वनस्पतिकोटींत जें असंख्य जातींचें वैचित्र्य दिसून येतें त्याचें कारण एका जातींतून दुसरी जात निर्माण होऊं

शकते असें शास्त्रज्ञ प्रतिपादितात. हें प्रतिपादन थिऑसफीला मान्य आहे. पण

## अदृश्य सृष्टींतील संशोधनाची भर

थिऑसफीनें या उत्क्रान्तिसिद्धातांत घातली आहे व तो सिद्धांत अधिक मूलग्राही व व्यापक केला आहे. थिऑसफीचें असें म्हणणें आहें कीं, प्रत्येक सृष्ट पदार्थाला दोन बाजू असतात. एक बाजू बहिरंगाची, द्रव्याची, बाह्य आकाराची वा शरीराची असते. दुसरी अंतरंगाची, त्या शरीरांत रहाणाऱ्या चैतन्याची, जीवाची असते. आपण माणसाकडे किंवा वानराकडे पाहिलें तर त्या दोघांना बाह्य बाजू आहे व ती शरीररचनेची आहे. या दोघांच्या शरीररचनेमध्यें पुष्कळच साम्य आहे हें शास्त्रज्ञांनीं दाखविलेलें आहे आणि त्या दोघांमध्यें जे फरक आहेत ते कसे उत्पन्न झाले त्यांचीं कारणेंही त्यांनीं शोधलेली आहेत. वानर व माणूस यांचा निकट संबंध आहे असें जें शास्त्रज्ञ मानतात तें थिऑसफीय दृष्टयाही खरें आहे. पण थिऑसफीचें आणखी असें म्हणणें आहे कीं, हें साम्य शारीरिक असून एकाचा देह मूलतः दुसऱ्यापासून निर्माण झालेला इतकेंच त्यावरून ठरतें. पण माणसाला जशी शरीराची बाह्य बाजू आहे तशी चैतन्याचीही अंतस्थ बाजू आहे. माणूस स्वतःला 'मी' म्हणतों, त्याच्या अंतर्यामीं विचार, भावना वगैरे अनेक चिजा आहेत. मनुष्यरूपी शरीरांत स्वतःला मी म्हणणारें हें चैतन्य त्या शरीराचा साधन म्हणून उपयोग करीत असतें. एखाद्या घराला खिडक्या, मोऱ्या, जिने, दरवाजे, विजेचे दिवे, पंखे वगैरे असतात ही त्या घराची बाह्य बाजू झाली. त्या घरांत कोणी तरी मालक रहात असतो व तो त्या घराचा त्या घरांतील खिडक्या–दरवाजांचा पंख्या –दिव्यांचा उपयोग करीत असतो. तद्वत् माणसाच्या देहांत मालकवजा चैतन्य असतें. तें चैतन्य त्या देहाच्या खिडक्या-दरवाजांचा (इंद्रियांचा) उपयोग करीत असतें. सर्व वस्तूंत सर्व वनस्पतींत आणि सर्व प्राण्यांत

ही चैतन्याची अथवा जीवनाची बाजू असते आणि जसजसा शरीराचा विकास होत असतो, शरीराची उत्क्रान्ति होत असते, तद्वत् आंतल्या

**चैतन्याचाही विकास**

होत असतो. उत्क्रांति नुसती शरीरालाच आहे असें नाहीं तर ती आंतल्या जीवालाही आहे. शास्त्रज्ञ फक्त शारीरिक उत्क्रान्ति ओळखतात. त्यांनीं चैतन्याचीही उत्क्रांति ओळखली पाहिजे असें थिऑसफीचें म्हणणें आहे. कुत्र्याची जात घेतली तर प्रत्येक कुत्र्याला एक विशिष्ट रचनेचा देह असतो. त्या देहाच्या आंत जीव असतो, चैतन्य असतें; आणि तो जीव त्या देहाचा उपयोग करीत असतो. कुत्र्याचा देह उत्क्रांतिमार्गावर बदलत जातो आणि कुत्र्यापेक्षां अधिक रचनावैचित्र्य असलेल्या ( Complex ) प्राण्याच्या जाति निर्माण होतात. त्याबरोबर त्या कुत्र्यांतील जीवही अधिक विकसित आणि समृद्ध होत असतो. त्या समृद्ध जीवाला कुत्र्याचा देह पुरेसा सोयिस्कर होईनासा झाल्यामुळें पुढें अधिक रचनावैचित्र्याच्या प्राणि-जातींत जाऊन रहातो. एखाद्या गरीब माणसानें एक साधें व लहान घर प्रथम बांधावें, थोडेफार पैसे मिळावयास लागल्यावर त्याचे व्यवहार व संसारही वाढल्यामुळें तें घर त्याला पुढें सोयिस्कर होऊं नये, मग त्यानें जास्त सोईचें व मोठें घर बांधावें; त्यानंतर त्याला पुष्कळच पैसे मिळूं लागल्यावर त्याचा व्यापारधंदा फार मोठा व नानाभानगडीचा होऊं लागावा व दुसरेंही घर आतां पुरेसें नसल्यामुळें वाढत्या गरजा भागविणारा व अधिक सोयी असलेला एक प्रशस्त बंगला त्यानें बांधावा, तद्वत् सृष्टीमध्यें होत असतें. सृष्टीमध्यें खनिज कोटि, वनस्पति कोटि, प्राणिकोटि, यामध्यें नाना जाति आहेत. एकेका जातीचे विशिष्ट बांध्याचे देह असतात. त्या देहांत विशिष्ट गुणविकास झालेले जीव (किंवा चैतन्य ) रहातात. देहांना उत्क्रांति असते आणि जीवालाही उत्क्रान्ति असते. जसजसें चैतन्य (जीव) अधिक समृद्ध व विकसित होत असतें तसतसे पूर्वींचे देह गैरसोयीचे होऊं लागतात. देहविषयक अधिक सोयी

असलेल्या जाति निर्माण होतात आणि त्या देहांत तें अधिक समृद्ध झालेलें चैतन्य राहूं लागतें. नुसती देहांना उत्क्रांति नाहीं तर आंतल्या जीवांनाही आहे. देह हें जीवाचें साधन आहे. सृष्टींत निरनिराळ्या दर्जाचे देह व त्यांच्या जाति असतात व त्या उत्क्रांतिक्रमानुसार निर्माण होत असतात. हे देह व त्यांच्या जाति उपजतात आणि मरतात. पण त्यांत चैतन्य असतें. त्या चैतन्याला ही उत्क्रांति असते. तेंही विकसित होत असतें. देह मेले तरी तें मरत नाहीं. एखादी प्राणि–जाति नष्ट झाली, तरी तें मरत नाहीं. तें जास्त सोयिस्कर अशा देहांत जाऊन तेथें व्यवहार करीत रहातें. सृष्टींत जो नाश होत असतो तो फक्त देहांचा होत असतो. चैतन्य कधींही नष्ट होत नाहीं.

उत्क्रांतिवादाकडे या दृष्टीनें पाहिल्यास उत्क्रांतिमार्गावर जो जीवनकलह चालू असतो व ज्या जीवनकलहांत जातींचा व व्यक्तींचा संहार होत असतो त्याचा खरा अर्थ वाचकांच्या ध्यानांत येईल, व अशारीतीनें त्या संहारांतील दुःख आभासिक आहे हें त्यांस समजेल.

उत्क्रांतिवादाकडे पहाण्याची जशी थिऑसफीची नवीन दृष्टि आहे, तशी इतिहासाकडे पहाण्याची नवीन दृष्टि आहे, तिचेंही येथें विवरण करणें उचित आहे.

## इतिहासाची रंगभूमि

माणसाचा देह घेतला तर तो निरनिराळ्या पेशींचा ( Cells ) बनलेला असतो असें इंद्रिय–विज्ञानशास्त्र सांगतें. भिंत जशी विटांनीं बांधलेली असते, तद्वतच माणसाचा देह पेशींनीं बांधलेला असतो. प्रत्येक पेशी हा एक एक पण स्वतंत्र जीव असतो. प्रत्येक पेशी उत्पन्न होते, कांहीं दिवस आपलें कार्य करते व शेवटीं नष्ट होते. असल्या पेशी निरनिराळ्या प्रकारांनीं एकत्र रचल्या जाऊन त्यांचा मानव देह बनत असतो. या मानव देहांत मनुष्याचा जीव रहात असतो. मानव देहांत स्वतःला ‘ मी ’ म्हणणारा जीव रहात असतो. तो जीव, व ज्या पेशींचा

देह बनलेला असतो त्या पेशींत असणारे असंख्य लहान जीव हे वेगळे असतात. थिऑसफीचें असें म्हणणें आहे कीं, मानव देहांत जशा पेशी असतात तशा देशांत नाना व्यक्ति असतात. राष्ट्रांतील प्रत्येक व्यक्ति म्हणजे एक एक लहान जीव होय. पेशी एकत्र गुंफल्या जाऊन जसा देह बनतो, तद्वत व्यक्ति एकत्र येऊन राष्ट्र बनतें. देहांत जशा कांहीं पेशी उत्पन्न होत असतात, कांहीं निरनिराळ्या क्रिया करीत असतात व कांहीं नष्ट होण्याच्या मार्गांत असतात, तद्वत राष्ट्रांतही कांहीं व्यक्ति जन्मास येतात, कांहीं व्यक्ति आपापले उद्योग करीत असतात आणि कांहीं व्यक्ति मरण्याच्या पंथास लागलेल्या असतात. देहांत जसा जीव रहात असतो तसा राष्ट्रांतही, त्यांतील व्यक्तीहून भिन्न असलेला, एक स्वतंत्र जीव रहात असता. ह्या जीवासच 'राष्ट्र' म्हणणें योग्य आहे असें थिऑसफीचें म्हणणें आहे. डॉक्टर, वकील, शिक्षक, सैनिक यांचीं उदाहरणें पाहिल्यास प्रत्येक व्यक्तीचा प्रकार वेगळा असतो, त्याचें वैशिष्ट्य वेगळें असतें, हें वाचकांच्या ध्यानांत येईल. त्याप्रमाणें इतिहासाच्या रंगभूमीवर जीं राष्ट्रें उदय पावतात त्या प्रत्येकाची तऱ्हा वेगळी असते. जशीं एकाद्या बागेंत निरनिराळीं फुलझाडें असतात, त्यांतील गुलाबाचें झाड एका विशिष्ट प्रकारानें वाढतें व एक विशिष्ट सुगंध त्या बागेंत निर्माण करतें; मोगऱ्याचें झाड अन्य प्रकारानें वाढतें व अन्य प्रकारचा सुवास बागेला देतें. तद्वत्

**प्रत्येक राष्ट्राची वाढ वेगळ्या प्रकारची**

असते आणि वेगळ्या प्रकारच्या उत्क्रांतीचा सुगंध त्या त्या राष्ट्रानें अखिल मानव जातीला द्यावयाचा असतो. इतिहासांत नाना राष्ट्रें उदय पावतात, मोठीं होतात आणि अस्तास जातात. या सर्व राष्ट्रांनीं एकंदर मनुष्य जातीच्या इतिहासांत आपापले विशेष गुण वाढवून प्रकट करावयाचे असतात. प्रत्येक देशानें विशिष्ट प्रकारची संस्कृति निर्माण करावयाची असते. याचा अर्थ असा होतो कीं, एकाद्या राष्ट्राला जर स्वतःचें व्यक्ति-

वैशिष्ट्य प्रकट करावयाचें असेल तर त्यानें दुसऱ्या राष्ट्रांची केवळ बाह्य नक्कल करून चालणार नाहीं. व्यक्ति तसें करील तर ती खुरटून जाईल. हें सर्वांस समजतें. स्वत:मध्यें गायन कलेचा विकास करण्याचें वैशिष्ट्य ज्या माणसामध्यें आहे त्यानें आपणा शेजारीं रहाणाऱ्या एकाद्या वकीलाच्या प्रॅक्टिसकडे पाहून वकिली सुरू केली तर तो ज्याप्रमाणें गायनकलेंत आणि वकिलींत दोन्हीही अपेशी होईल, तद्वत एका राष्ट्रानें दुसऱ्याचें अंधानुकरण केलें तर तें राष्ट्र इतिहासांत पुढें येणार नाहीं. इतिहासांतील नाना राष्ट्रें व नाना संस्कृति शाळांतल्या वर्गासारख्या असतात. प्रत्येक वर्गांत मुलें जाऊन शिकतात, व त्या त्या वर्गांतले धडे शिकून तीं तयार होतात. गणिताच्या वर्गांत मुलगा प्रामुख्यानें गणित विषय शिकतो, ड्रॉइंगच्या वर्गांत चित्रकला शिकतो, सायन्सच्या वर्गांत प्रयोग शिकतो. थिऑसफीचें म्हणणें असें आहे कीं जग ही एक शाळा आहे. निरनिराळीं राष्ट्रें व त्यांनीं निर्माण केलेल्या संस्कृति ह्या त्या शाळेंतील वर्गासारख्या आहेत. प्रत्येक माणूस निरनिराळ्या संस्कृतींत आणि राष्ट्रांत जन्म घेतो आणि दर संस्कृतींत वेगवेगळे धडे शिकून त्याची चौफेर वाढ होत असते.

ह्या दृष्टीनें जर आपण मानवी इतिहासाकडे पाहिलें तर इतिहासाचें मर्म आपल्या लक्षांत येईल. राष्ट्र म्हणजे परस्परांशीं लढणारे माणसांचे गट होत असें आज लोकांस वाटतें. जर थिऑसफीची वरील शिकवण माणसाच्या ध्यानांत आली तर इतिहासाला नवें वळण लागेल. प्रत्येक राष्ट्रानें व संस्कृतीनें आपापलें वैशिष्ट्य कायम ठेविलें पाहिजे, एका संस्कृतीनें दुसऱ्या संस्कृतीचें आंधळेपणानें बाह्यनुकरण करणें हा वेडेपणा आहे, हें सूज्ञांस समजून येईल. शाळेंतील गणिताचा वर्ग, ड्रॉइंगचा वर्ग, सायन्सचा वर्ग यांपैकीं कोणताही वर्ग श्रेष्ठ नाहीं व कोणताही कनिष्ठ नाहीं. प्रत्येकांत कांहीं विशिष्ट गुण आहेत, व त्या त्या वर्गांत शिकत असतांना प्रत्येक शहाण्या विद्यार्थ्याचें काम तेथील विशिष्ट धड्यांकडे जास्त लक्ष देण्याचें असतें. तद्वत् प्रत्येक राष्ट्राचें काम आपापली विशिष्ट

संस्कृति वाढविण्याचें असतें, व जरी ह्या सर्व संस्कृति वेगवेगळ्या असल्या तरी त्या परस्परांस विरोधक नसतात. मानवी विकास सर्वांगीण होण्याकरितां त्या सर्व संस्कृति पृथ्वीवर असणें आवश्यक आहे, हा विचार जनतेस पटला तर पृथ्वीवरील नाना संस्कृतींचे झगडे बंद होऊन इतिहासच्या रंगभूमीवर निरनिराळ्या संस्कृतींचे वेगळाले सूर परस्परांत मिळून एक उत्कृष्ट जलसा निर्माण होईल.

थिऑसफिकल

**सोसायटीचा दरवाजा सर्वांना उघडा**

आहे. वाटेल त्या माणसाला, मग तो माणूस स्त्री असो पुरुष असो, काळा असो गोरा असो, कोणत्याही देशाचा वा धर्माचा असो, त्याचीं मतें कांहींही असोत, त्याला सोसायटीचा सभासद होतां येतें. थिऑसफीचे सिद्धांत मान्य नसले तरीही त्याला सभासद होतां येतें. मात्र थिऑ-साफिकल सोसायटीचे जे उद्देश आहेत त्याबद्दल, विशेषतः बंधुत्वाबद्दल, त्याच्या मनांत सहानुभूति असली पाहिजे. जरी वाटेल त्या माणसाला सभासद होण्याची मोकळीक असली तरी सभासद वाढविण्याची खटपट सोसायटी करीत नाहीं. सोसायटीला सभासद हवे आहेत पण जे हौसेनें सोसायटींत येतील व सोसायटीच्या कामास उत्साहानें हातभार लावतील असेच सभासद सोसायटीला हवे आहेत. म्हणून थिऑसाफिकल सोसायटी जरी सर्व जगभर जोराचा मतप्रचार करीत असली तरी मुद्दाम सभासद वाढविण्याची खटपट करीत नाहीं.

थिऑसफिकल सोसायटीच्या आपल्या

**सभासदांबद्दल कांहीं अपेक्षा**

आहेत. ज्या अर्थी सोसायटी हा विश्वबंधुत्वाचा एक केंद्र आहे त्या अर्थी सोसायटीमध्यें बंधुत्वाचें वातावरण असणें अवश्य आहे. अर्थात् सर्व सभासदांनीं बंधुत्वाचे वृत्तीनें परस्परांशीं खेळीमेळीनें वागलें पाहिजे. मतभेद कितीही झाले तरी त्याची भांडणांत परिणति होतां उपयोगी

नाहीं, एकानें दुसऱ्यावर वाईट हेतूचा आरोप करतां कामा नये, जसें मला सर्व बाबतींत मत-स्वातंत्र्य आहे तसें दुसऱ्यांनाही आहे हें सर्व सभासदांनीं ओळखलें पाहिजे. सोसायटींत नाना धर्मांचे, नाना जातींचे, नाना देशचे, व भिन्न आचारविचारांचे लोक येतात. थिऑसाफिकल सोसायटी ही जागतिक संस्था असल्यामुळें इतर संस्थांच्या मानानें या सोसायटींत पुष्कळच वैचित्र्य असणार हें उघड आहे. हें वैचित्र्य परस्परांशीं भांडण्यासाठीं नसून एकानें दुसऱ्यापासून नवीन गोष्टी शिकून स्वतःचा जलदीनें आत्मविकास करण्यासाठीं आहे. हा विचार सभासदांनीं आपल्या मनांत सदैव ठेविला पाहिजे अशी सोसायटीची अपेक्षा आहे.

सोसायटींत सभासदावर कोणतेंही बंधन नसतें. सभासदानें अमुक एक केलें पाहिजे, अमुक गोष्ट करतां कामा नये, त्यानें अमुक रीतीनें वागलें पाहिजे असे नियम सोसायटींत नाहींत; पण नियम नसले तरी प्रत्येक सभासद ध्येयवादी असला पाहिजे अशी सोसायटीची अपेक्षा असते. ध्येयवादाची ज्योति स्वतःच्या अंतरंगांत जर सतत तेवत ठेवावयाची असली तर त्यासाठीं सभासदांनीं अभ्यास केला पाहिजे हें उघड आहे. थिऑसफीचें वाङ्मय उत्कृष्ट आहे. त्याचा सभासदांनीं मन लावून अभ्यास करणें जरूर आहे. त्याचप्रमाणें प्रत्येकानें स्वतःच्या धर्माचा अभ्यास करावयास हवा. नुसता स्वतःच्या धर्मांचा अभ्यास पुरेसा नाहीं, तर जगांतील इतर सर्व धर्मांचा अभ्यास केला पाहिजे. खेरीज हल्लींचीं भौतिक शास्त्रें, हल्लींच्या नाना चळवळी, हल्लींच्या तत्त्वज्ञान-पद्धति यांशींही त्याचा परिचय असणें जरूर आहे. तरच त्याला थिऑसफीचें मर्म नीट समजेल.

ध्येयवाद जर पोकळ नसावा असें माणसाला वाटत असेल तर त्यानें कोणतें तरी सत्कार्य हातीं घेतलें पाहिजे हें स्पष्ट आहे. सर्व थिऑसफीय सभासदांनीं बंधुत्वाला पोषक असलेलें असें लोकसेवेचें कोणतें ना कोणतें

तरी कार्य अंगावर घेतलें पाहिजे. जगांत पुष्कळ ध्येयवादी उद्योग लोकांनीं काढलेले आहेत. त्यांपैकीं आपल्या स्वभावास अनुरूप असा कोणता तरी उद्योग प्रत्येक सभासदानें पसंत करावा व त्या क्षेत्रांत काम करावें अशी सोसायटीची शिकवण आहे. सोसायटीच्या सभासदांनीं नवीन उद्योग सुरू करावे अथवा जे लोकहिताचे उद्योग इतरांनीं काढले असतील त्यांस हातभार लावावा, पण आळशी रहातां उपयोगी नाहीं. जग इतकें अज्ञ व असंस्कृत आहे, कीं त्याला सुधारण्यासाठीं नाना क्षेत्रांत अनंत प्रयत्न करणें जरूर आहे. अशा परिस्थितींत थिऑसफिकल सोसायटीचा कोणताही सभासद निष्क्रिय बसेल तर तो अक्षम्य अपराध होय.

लोकसंग्रहार्थ केलेले सर्वच उद्योग स्तुत्य असतात. पण कांहीं उद्योगांचे फायदे उघड उघड दिसून येण्याजोगे असतात व असले उद्योग करणारीं माणसेंही संख्येनें पुष्कळ असतात. पण कांहीं उद्योग फक्त दूर दृष्टी असणाऱ्या माणसांच्याच डोळ्यांत भरतात. ज्या उद्योगांचें फळ तात्काळ मिळण्याजोगें असतें त्या उद्योगांत पडणारीं माणसें अनेक असतात; पण जें कार्य सद्यःफलदायी नाहीं, दूरवर दृष्टि असल्याशिवाय ज्या कार्याचें महत्त्व लक्षांत येत नाहीं असले उद्योग करणारीं माणसें विरळा. असल्या माणसांस जनतेची सहानभूति तर मिळत नाहींच, पण पुष्कळदां विरोध सहन करावा लागतो. जो असल्या उद्योगांत पडेल त्याला बहुधा त्या उद्योगाची धुरा एकट्यानेंच आपल्या खांद्यावर वाहावी लागते. विशेषतः असले उद्योग अंगावर घेणें हें थिऑसफिकल सोसायटीच्या सभासदांचें महत्त्वाचें कर्तव्य होय.

अभ्यास करणें, व लोकसंग्रहाचे उद्योग अंगावर घेणें ह्या दोन गोष्टी जशा थिऑसफिकल सोसायटीच्या सभासदांनीं करणें जरूर आहे त्याचप्रमाणें स्वतःचा गुणविकास करणें,

## स्वतःचें शील सुधारणें

हेंही त्यांनीं केलें पाहिजे. सर्व गोष्टींना जसा विकास आहे तसा मानवी गुणांना, मनुष्याच्या नाना सामर्थ्यांना, ही विकास असतो. जग सुधारण्याचा प्रयत्न करणें हें जसें अवश्य आहे, तद्वत् स्वतःला सुधारण्याचा उद्योग करणें, स्वतःची भक्ति, स्वतःची ज्ञानशक्ति, स्वतःची क्रियाशक्ति याही माणसानें वाढविल्या पाहिजेत. जसजसा हा स्वतःचा अधिकार अधिक अधिक वाढेल त्या मानानें त्याची जगावर जास्त छाप पडून त्याचें कार्य अधिक परिणामकारक होईल हें उघड आहे.

---

## थिऑसफी–एक सेतु

थिऑसफी ही एक पद्धति आहे–तत्त्वज्ञानाची म्हणा पाहिजे तर. तिचें एक मोठें वैशिष्ट्य म्हणजे ती एकाद्या सेतूसारखी आहे. उदाहरणार्थ, धर्म व भौतिकशास्त्र यांचा समन्वय करणारा ती एक दुवा आहे. कारण, धर्म हा सर्वस्वी शास्त्रशुद्ध पायावर उभारतां येईल, असें प्रतिपादणारी थिऑसफी ही एकच पद्धति आहे, असें मला वाटतें. आज भौतिक-शास्त्र हें धार्मिक विचारांच्या मालिकेंत आलेलें आहे. त्या दोहोंतील अंतर सांधण्याच्या थिऑसफीच्या कार्यामुळेंच बव्हंशीं हा समन्वय झाला आहे. तसेंच थिऑसफी हा केवळ धर्म व भौतिकशास्त्र यांनाच जोडणारा एक सेतु नसून, धर्माधर्मांतला, ज्ञानाज्ञानांतला, दृश्यादृश्यांतला, राष्ट्राराष्ट्रांतला, पूर्व–पश्चिमेंतला, देव–मानवांतला आणि सृष्टींतील खनिज–मानवा–दि सर्व कोटींमधलाही तो सेतु आहे.

—लेडबीटर

---

**सोसायटीचें उदार धोरण** : त्यामुळें अमुक एका सिद्धान्तावर तुम्हीं श्रद्धा ठेवली पाहिजे, असा कोणाशींही आग्रह धरण्याचें त्यांच्या मनांत येत नाहीं. अंतः-स्फूर्तीनें वा अभ्यासानें ज्ञान मिळाल्यावर आपोआप जिज्ञासूची श्रद्धा बसेल, हें जर खरें, तर कोणतेही सिद्धान्त त्याच्या गळ्यांत आजच घाईनें बांधण्याचें प्रयोजन नाहीं. 'बाबावाक्यं प्रमाणम्' या न्यायानें कोणत्याहि सिद्धान्तास मान डोलविण्यापेक्षां तद्विषयक ज्ञान संपादन केल्यास जी त्याबद्दल निश्चयबुद्धि वाटते तीस अर्थात् अधिक किंमत आहे. थिऑसॉफिकल सोसायटीच्या सभासदांची अशी विचारसरणी असल्यामुळें ते सर्वांशीं—अनुदार माणसांशींही—उदार बुद्धीनें वागतात व असें वागणें हें आपलें अवश्य कर्तव्य समजतात, हें उघडच आहे. लोक अज्ञानी असतील तर त्यांचें अज्ञान घालविलें पाहिजे, त्यांस शासन करण्यांत अर्थ नाहीं, ही त्यांची भावना; प्रत्येक धर्म म्हणजे पराविद्येचें एक विशिष्ट स्वरूप ही त्यांची समजूत; म्हणून धर्मांचे दोष काढीत बसण्यापेक्षां त्यांचें अध्ययन करणें, व धर्मांत श्रेष्ठ कनिष्ठ अशा प्रती लावीत बसून धर्मांतरास उत्तेजन देण्यापेक्षां प्रत्येकास आपआपल्या धर्मांप्रमाणें वागण्यास सांगणें हें अधिक श्रेयस्कर होय, असें ते आपलें धोरण ठेवतात. सर्वांशीं समेट, सख्य व प्रेम हें त्या जिज्ञासूंचे ब्रीद आहे व सत्य हें त्यांचें ध्येय होय.

सर्व धर्मांच्या मुळाशीं असलेले सिद्धान्त हीच आत्मविद्या किंवा थिऑसफी. अर्थात् ते सिद्धान्त फक्त आमच्याच धर्मांत आहेत असें कोणालाही म्हणतां येणार नाहीं. आत्मविद्यांतर्गत तत्त्वज्ञानानें मानवी जीविताचा प्रश्न सुटतो; व प्रेम आणि न्याय हे उत्क्रान्तिक्रमाचे आधारस्तंभ आहेत हें सिद्ध होतें.

**मृत्यूचें कोडें** : जीवाच्या दीर्घ चरित्रांत देहांस अनेकवार मृत्यु येत असतो व मृत्यूच्या द्वारांतून पलीकडे गेलें म्हणजे इहलोकींच्या आयुष्यापेक्षां अधिक तेजस्वी आयुष्यक्रमाचा अनुभव माणसांस मिळतो. हें उत्क्रांतिक्रमांतील मृत्यूचें स्थान आत्मविद्येच्या अध्ययनानें माणसाच्या ध्यानांत येऊन त्याविषयींचें त्याचें भय नाहींसें होतें. मनुष्य हा आत्मा आहे आणि देह व मन हे त्याचे सेवक आहेत. ही गोष्टही आत्मविद्येनें सिद्ध होते. धर्मग्रंथ व धर्मसिद्धांत यांतील रहस्यात्मक भागही आत्मविद्येनें उघड होतात व अंतःस्फूर्तीच्या (इंट्युइशनच्या) कसोटीप्रमाणें बुद्धीच्याही कसोटीस ते उतरूं लागतात.

**थिऑसफिकल सोसायटीचे सभासद** या सिद्धांताचें अध्ययन करतात व खरे थिऑसफिस्ट तद्वत् आचरण करण्याचा प्रयत्न करतात. अध्ययन करणें, परमताविषयीं आदर ठेवणें, उच्च ध्येय बाळगून त्याकरितां सतत उद्योग करणें या गोष्टींची ज्यास आवड असेल, त्याचें सभासद म्हणून सोसायटी आनंदानें स्वागत करील. पुढें खरा थिऑसफिस्ट होणें ज्याच्या त्याच्या प्रयत्नावर अवलंबून रहाणार आहे.

---

# मराठी थिऑसॉफिकल फेडरेशननें प्रसिद्ध केलेलीं पुस्तकें

| | | किंमत |
|---|---|---|
| १. | **थिऑसफीवरील सुबोध व्याख्यानें :** (डॉ. बेझंट यांच्या सुरस व्याख्यानांचें सरस भाषांतर) : ले.—द्वै. भा. लेले | १–०–० |
| २. | **सिद्धपुरुष व त्यांचा संप्रदाय :** ले.— श्री रा. स. भागवत व वा. ल चिपळूणकर— एका प्राचीन महान् आदि संप्रदायाची अपूर्व माहिती. | २–०–० |
| ३. | **महंमद पैगंबर व त्यांचा इस्लाम धर्म :** ले.— वा. ल. चिपळूणकर. | ०–४–० |
| ४. | **भारत-समाज-विरचित हिंदु सामुदायिक पूजा**—(मूळ संस्कृत-मराठी अर्थ व टीपा—सहित-) संपादक—रा. स. भागवत, एम्. ए. (ठाणें) | ०–६–० |
| ५. | **आत्मविद्येचीं मूलतत्त्वें :** भाषांतरकार— श्री. रा. स. भागवत | |
| ६. | **योगशास्त्रप्रवेश :** भाषांतरकार— श्री. रा. स. भागवत | |
| ७. | **मेस्मेरिझम् :** ले.—श्री. रा. स. भागवत (स्वतंत्र ग्रंथ) | |
| ८. | **मरणोत्तर स्थिति व परलोकविद्या :** ले.—श्री. रा. स. भागवत (स्वतंत्र ग्रंथ-दुर्मिळ) | |
| ९. | **धर्माचे मूलसिद्धांत :** ले.—रा स. भागवत (भाषांतर) | हल्लीं दुर्मिळ |
| १०. | **कर्ममीमांसा** (भाषांतर) | |
| ११. | **केवळ हिंदुधर्मासाठीं** (भाषांतर) | |
| १२. | **सनातनधर्मप्रवेश** (भाषांतर) | |
| १३. | **परलोकचा प्रवास** (रूपांतर) | |
| १४. | **आनंदाचें साम्राज्य :** (श्री. जे. कृष्णमूर्ति यांच्या प्रवचनांचें रूपांतर) | |
| १५. | **साधनचतुष्टय :** ले.—श्री. जे. कृष्णमूर्ति (भाषांतर) | |
| १६. | **मुमुक्षु-मार्ग** (भाषांतर) | |
| १७. | **ध्यान-योग**—ले.—दा. ग. खापर्डे | |

वरील पुस्तकें इंटर नॅशनल बुकसर्व्हिस—पुणें नं. ४ कडून विकत मिळतील.